# श्रावणसरी

[ लघुकथा : लोककथा ]

लेखक

**विष्णु गणेश भिडे**

प्रस्तावनाकार

महामहोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार, बी. ए.

आश्विन शु १०
शके १८६८

मूल्य
दोन रुपये

महाराष्ट्राचे विख्यात इतिहाससंशोधक म. म. प्रा. दत्तो वामन पोतदार, बी. ए., यांच्यामागें पुण्यांतील व पराठिकाणच्या कामांनीं सतत एक-सारखी लावलेली चिमट मी डोळ्यांनींच पाहात होतों. त्यांना वरचेवर प्रवासास जावें लागत होतें. अशा अतिशय गडबडींत वेळ काढून माझी विनंति न अव्हेरतां त्यांनीं प्रस्तावना दिली. महामहोपाध्यायांनीं केलेला हा अनुग्रह माझ्या सदासर्वकाळ स्मरणांत राहील.

—रा. रा. वि. चिं. देसवंडीकर, शि. ना. कोळमकर व वि. गं. तळवलकर, बी. ए., या स्नेह्यांना माझ्यासाठीं पडलेली थोडीफार तसदी त्यांनीं आनंदानें सोसली हें येथें नमूद करणें अवश्य आहे.

१-१०-४६ विष्णु गणेश भिडे

# प्रस्तावना

एक प्रकारें असें म्हटलें तरी चालेल कीं मराठी वाङ्मयांत हल्लीं लघु-कथाचें युग सुरू आहे. नित्यशः अनेक कथा लिहून प्रसिद्ध होत आहेत. छापण्याचीं यंत्रें निघाल्यापासून वाङ्मय भराभर हातीं मिळण्याची सोय झाली आहे. आणि यामुळें एकदा वाचलेली कथा पुन्हा वाचण्याची गरज कमी होत आहे. रामाच्या किंवा कृष्णाच्या त्याच त्याच कथा सतत आळवीत बसण्याचें आता कारण उरलें नाहीं. वाचकांना रोज रोज नव्या कथा पुरवण्यासाठीं आतां लेखकांना नवे नवे विषय शोधकपणानें हेरून, त्यांना कथेचा पेहराव चढवून ते लोकासमोर माडण्यात उत्साह वाटेल.* साहजिकच निरीक्षणाचें क्षेत्र वाढलें आहे आणि दृष्टींतला सूक्ष्मपणा विकास पावला आहे.

केव्हाहि वाचणाराची संख्या लिहिणारापेक्षा लक्षपटीनें अधिक असणार. आणि त्यामुळें नवीन नवीन निवडक कथाचा भरपूर पुरवठा होणें कधींच शक्य नाहीं. यामुळें आलटून पालटून आणि इकडे तिकडे नावें गावें बदलून कधीं कधीं मुळात एकच असलेली कथा अनेक रूपांनीं समाजातून हिंडताना दिसते. असें असलें तरी काहीं नेकीचे लेखक आपल्या सूक्ष्म निरीक्षणानें प्रशंसनीय अशा प्रकारची नवनिर्मिति करताना आढळतात.

नवनिर्मिति असें म्हणतांना असा अभिप्राय नाहीं कीं ती निर्मिति अगदीं अपूर्व आणि जगात अन्यत्र कोठेंहि प्रकट न झालेली अशी असते. बाजारी घोळक्यापासून ज्यांचें निरालेपण घटकाभर तरी मन ओढून घेईल अशा निर्मितीला नवनिर्मिति म्हणण्यास काहीं चिंता नाहीं.

रा. विष्णु गणेश भिडे यानीं सोडलेल्या 'श्रावणसरी' या वर वर्णन केल्याप्रमाणें नवनिर्मितीच्या सदरात बसवण्यास काहीं अडचण पडणार नाहीं असें आम्हास वाटतें. पट्टीच्या लघुकथावाचकास हा अभिप्राय

कितपत मानवेल तें सांगतां येत नाहीं. कारण आम्ही आपणांस उघड उघड त्या वर्गांत बसवूं शकत नाहीं. लघुकथाच्या जन्ममृत्यूंची कसोशीनें नोंद करणाऱ्यांच्या हिशेबीं काय निघेल तें निघो, आमच्या दृष्टीला दिसलें तें येथें प्राजलपणें सागितलें आहे.

या 'श्रावणसरीं'त वास्तविक दोन झडी आहेत. एकींत आठ सर आहेत आणि दुसरींत पाच आहेत. पहिल्या झडींतील सराची रचना लेखक राजश्री भिडे याची स्वतःची आहे तर दुसरींतील पाच कथा रा. भिडे यानीं जुन्या लोकाकडून मिळवलेल्या आहेत. या लोककथा आहेत.

मोहक वर्णनें, घोटीव शब्द, रेखीव प्रमाणबद्धता यावर रा. भिडे याचा भर असल्याचें दिसून येत नाहीं. समाजाला जें कोठे काहीं तरी बोचतें किंवा टोंचतें आहे तेंच नेमकें शल्यासारखें उपटून काढून समाजाचें दुःख हलकें करण्यास मदत करावी असा त्यांचा हेतु स्पष्ट दिसतो. 'श्रावणसरी' लोकाना झोडपण्याकरता नाहींत किंवा त्याच्या वर्षावातील मनोहारित्वानें चकित आणि हर्षित करण्याकरतांहि त्याचा जन्म दिसत नाहीं. आपल्या जीवनांतल्या शेतींत सद्भावनाचें आणि सद्‌विचाराचे काहीं तरी पीक काढतां यावें असा हेतु लेखकाचा असावा असें या कथा वाचून आमचें मत झालें आहे. ढोंगीपणाचा लेखकास अत्यंत तिटकारा आहे. ज्याना 'सफेदपोश' म्हणतात त्याच्या अंगावरील सभ्यपणाचे सफेद अभ्रे फाडून टाकून त्याचीं काळीं कुट्ट काळिजें उघडीं करून दाखवण्याचा लेखकानें प्रयत्न केला आहे. असलीं कुजकीं काळिजें असलेला समाज कधींहि मनाचा निरोगी असणार नाहीं. मनाचा निरोगीपणा ही व्यक्तीच्या किंवा समाजाच्या थोरवीची अचूक खूण होय. भिडे याच्या कथा वाचून वाचकांस कोठेंच गुदगुल्या होणार नाहींत पण त्याचें मन कळवळल्याशिवाय मात्र राहणार नाहीं.

या संग्रहातील पहिली गोष्ट 'चादीचें सफरचंद' ही आहे. गरीब यशवंत आणि त्याची म्हातारी आई सुदेष्णा याच्यावर आश्रयाचा उपकार केल्याचें ढोंग करून राधाबाईने या मायलेकाचा आतून कसा छळ केला आणि मानी व सुशील यशवंताच्या सद्‌भावनाचा कसा धिःकार केला हें चित्र या गोष्टींत लेखकानें वाचकासमोर माडलें आहे. आपल्या गरिबींत पूर्वीच्या वैभवाची

आणि उमद्या संसाराची साक्ष म्हणून जिवापलीकडे जतन करून ठेवलेलें एक सुंदर चांदीचें रामरचंद म्हातारीच्या अंत्यविधीच्या दुर्धर प्रसंगांत यशवंतास अडवून राधाबाईने कसे हरण करून घेतलें आणि त्याच्या मानी मनाचा कसा मोड केला हें लेखकानें उत्कृष्टपणानें दाखवलें आहे. 'कोंडलेली वाफ' या पुढील गोष्टींत ढोंगीपणाचें दुसरें चित्र आपणांस पाहावयास मिळेल. या कथेंतले ढोंगी श्रीमंत बापाचे चिरंजीव भाई रघुवीर हे आहेत. रात्रंदिवस कष्ट करून व पोटाला चिमटा घेऊन मजुरांची संघटना केली सदोबानें आणि श्रेय उपटलें फुकट पुढारी भाई रघुवीर यानें ! बिचारा सदू ऑफिस बॉय ठरला आणि मरणाच्या दारीं गेला. अंतःकरणातल्या कोंडलेल्या वाफेनें तो भाजून निघाला आणि तोंडाच्या वाफेनें भाई रघुवीर यांचा जयजयकार झाला. सांप्रत असे रघुवीर आणि असे सदू शोधून काढण्याकरता आपणाला फार लांब जावें लागणार नाहीं. 'रंगदास चांभार' ही तिसरी गोष्ट जरा लांबट झाली आहे आणि लघुकथेच्या फटकाऱ्यापेक्षां निबंधाच्या पसाऱ्याचें स्वरूप तिला आले आहे. 'उन्मत्त हत्ती' या कथेंतहि केलेले उपकार विसरून उन्मत्त झालेल्या कोंडोपंतांच्या ढोंगी–नीचपणाचें चित्रण आपणास आढळते. उदार आणि त्यागी उपकारकर्त्या बंडेरावाचा स्वार्थसाधू कोंडोपंतानें बळी घेतला. 'गिधाडाची झडप' या गोष्टींत रंगवलेला प्रसंग आपल्या खेडेगावातून अनेक ठिकाणीं आपणांस प्रत्यक्ष अनुभवावयास मिळेल. अण्णा जहागिरदारासारखे पोकळ प्रतिष्ठित लोक अमृता तेल्यासारख्या सरळमार्गी, कष्टाळू व अश्राप माणसाच्या नाशाला कसे कारण होतात आणि असल्या अण्णानींच आमच्या खेडेगावांतून सुखाचा गावगाडा कसा विध्वंसून टाकला आहे याचें दृश्य येथें आपणास पाहावयास मिळेल. 'पेंच' ही अगदीं लहानशी गोष्ट आहे. या जगात पदोपदीं येणारा पण अननुभवी तरुणाच्या लक्षात न येणारा असा महत्त्वाचा अनुभव तींत ग्रथित केला आहे. हैबती टांगेवाला यानें फौजदारास आपला टांगा फुकट दामटू दिल्यामुळे त्याच्या दुबळेपणाला दोष देणारा गंगाधर जागेच्या लोभानें मालकाचे कागद फुकट टाइप करून देण्याचें पत्करून आपली शंका परस्पर फेडून घेतो आणि नवा पण महत्त्वाचा अनुभव शिकतो हें या अतिशय लहान कथेंत थोडक्यांत पण चटकदार पद्धतीनें मांडलें आहे.

'बांधावरल्या बामळीं'त दुराग्रही चिंदंबरपंताला पिऱ्याच्या मखाईची सावली नष्ट केल्याबद्दल कशी अद्दल घडली हें दाखवलें आहे. असल्या चिंदंबरपंताचे नमुने आपल्या खेडेगावातून विपुल आहेत आणि याच खेडेगांवांतून शेवटच्या गोष्टींत दिलेले पराशरबाबासारखे उपद्व्यापी लोक मणीसारख्या लोकावर द्वेषबुद्धीने कुभाड घेऊन गावातील जीवनाची कशी नासाडी करतात तें आपणास पाहावयास सापडतें. अशा या 'श्रावणसरीं'तील आठ कथा आहेत. खेडेगावातील जीवन सुधारणे म्हणजेच आमच्या देशाचा उद्धार करणें आहे. त्या कामातील कांहीं अडचणी यशाच्या आड कशा येतात तें रा. भिडे यानीं वरील आठपैकीं बऱ्याच कथात दाखवून दिलें आहे.

'श्रावणसरीं'तील दुसरा भाग पांच लोककथाचा आहे. यातील 'ऊन्ह धरणारी बायको' ही कथा अगदीं आधुनिक वळणासारखी आहे. नवीन लघुकथा नव्हत्या त्या वेळेस आमच्या समाजात अशा अनेक प्रकारच्या लोककथा आमच्या समाजाचें रंजन करीत असत. हें आमचे लोककथाभाडार म्हणजे आमचे एक अपूर्व धन आहे. या कथा सांगून आणि ऐकून शतकानुशतकें आमच्या समाजातील बायकामुलानीं आपल्या कष्टमय जीवनाला गोडी आणली आहे. वाचावयास नवीन कथा वाटेल तितक्या मिळावयास लागल्यामुळें लोककथाभाडाराची आमच्याकडे उपेक्षा होत आहे ही मोठी दुःखाची गोष्ट होय. आमची वृद्ध पिढी जशी जशी कालवश होत आहे तसतसे या मुखबद्ध कथाचें भाडारहि नष्ट होत आहे आणि यामुळें आमची अपरंपार हानि होत आहे.या उपेक्षित साहित्याकडे लक्ष पुरविल्याबद्दल रा. भिडे याचे आम्हास मनापासून अभिनंदन करावेंसें वाटतें.

आमच्या संस्कृतीचें लोककथा हें एक प्रमुख अंग आहे. तें गळून पडेल, म्हणून जागरूकपणें आम्हीं जर प्रयत्न केले नाहींत तर आम्ही संस्कृतीचे आणि समाजाचे गुन्हेगार ठरूं. नवीन कथा कितीहि रचल्या तरी शेकडों वर्षांपासून चालत आलेल्या आमच्या या लोककथाची पूर्वीइतकीच गरज आम्हास आजहि आहे. होता होईल तों या कथा जितक्या जुन्या आणि मूळ स्वरूपात आमच्या पुढें येतील तितक्या आम्हास पाहिजे आहेत. आमच्या सुशिक्षित स्त्रिया आपल्या अशिक्षित म्हटल्या

गेलेल्या भगिनीवर्गाजवळील संस्कृतीचा हा अपूर्व ठेवा जतन करून ठेवण्याचा कांहींहि यत्न करीत नाहींत. त्यामुळें जेव्हां एखादी कुमारी अनसूया भागवत किंवा एखादा शंकर गणेश दाते, साने गुरुजी, चोरघडे, किंवा प्रस्तुतचे भिडे याच्यासारखा या धनाचा रक्षक पुढें येतो तेव्हां त्याचें अत्यंत हार्दिक स्वागत करणें हे आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

गद्य काव्याप्रमाणें पद्य गाण्याचाहि आम्हांस संग्रह केला पाहिजे. निरनिराळ्या जातींत रूढ असलेलीं अनेक प्रसंगावरील शेकडों गाणीं, ओव्या आणि कथा आमच्या समाजात अद्यापहि जीव धरून आहेत. एकदा सहज महाबळेश्वरीं असताना विहीर खणणाऱ्या मुसलमान धर्माच्या पण अस्सल मराठी ठेवणीच्या मजूर स्त्रियांनीं कामाचा भार हलका करण्यासाठीं म्हटलेलीं गाणीं आमच्या कानात अद्यापहि घुमत आहेत. कोळी जीवनातला प्रसंग आहे;—

**आपडी न् थापडी करूं मी कुणाला**
**खाणार गेलाय् व्हडीला ग ।**

अशा मधुर ठेक्यात चाललेलीं त्याचीं दणगट काव्यें आमच्या स्मरणांतून कधीं जाणार नाहींत. तरीहि पण आम्ही आपणास अशिक्षित समजत आलों आहोंत. आमच्या लोककथाचें आणि लोकगीताचें अपूर्व भांडार हस्तगत करून जर आम्ही प्रकट करूं तर आमचे हे असले भ्रम लयाला गेल्याशिवाय राहणार नाहींत. अखिलभरतखंडात या टोकापासून त्या टोकापर्यंत शेकडोंशे जातींत शब्दशः हजारों लोककथा आणि लाखों गीतें आपणास गोळा करता येतील. आमच्या समग्र जीवनाची गुंफण त्यात झाली आहे. सर्व रसाचें दर्शन आम्हास या कथांतून आणि गीतातून खचित खचित होण्यासारखें आहे. अशा लोककथा मिळवून या 'श्रावणसरीं'त त्यातील एक पंचक समाजास सादर केल्याबद्दल रा. भिडे याचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे.

आश्विन शु. ४।६८ }
२८।९।४६ पुणें }

**दत्तो वामन पोतदार**

माझ्या ममताशील मामी

सौ. इंदिराबाई सोहोनी

यांस

नम्रतापूर्वक

अर्पण

# तारी


| लघुकथा | पान | लोककथा | पान |
|---|---|---|---|
| १ चांदीचे सफरचंद | १ | १ केतकीचं फूल कोण तोडतंय् ? | ७५ |
| २ कोंडलेली वाफ | १२ | २ बिलंदर जालंदर | ८३ |
| ३ रंगदास चाभार | १९ | ३ " अस्सल ते कमअस्सल " | ९० |
| ४ उन्मत्त हत्ती | २९ | ४ ऊन्ह धरणारी बायको | ९६ |
| ५ गिधाडाची झडप | ४१ | ५ काश्मिरी कापड | १०५ |
| ६ पेंच | ४९ | | |
| ७ बांधावरल्या बाभळी | ५२ | | |
| ८ केला यत्न, झाला यज्ञ | ६२ | | |

# चांदीचें सफरचंद : : १

वासनिक हळदीकुंकू राधाकाकूंच्या इतकें झोंकदार, त्या आळींतल्या, एवढेंच नव्हे तर पलीकडच्या बोळात असणाऱ्या घरात एकीचेंहि झाले नाही.

मांडलेल्या गौरीची प्रशंसा करीत करीत बायका बाहेर पडत होत्या.

गौर पाहून धन्यवाद गाणाऱ्या बायका म्हणत.

'काय सुरेख आरास झाली आहे हो ! ... विजेच्या दिव्यांच्या प्रकाशात चित्रं नुसतीं खुलून दिसताहेत.. तो किल्ला...ते शिपाई ... ती आगगाडी ... ती मोटार ... अन् चांदीचं सफरचंद ... ते तर फारच सुंदर दिसत आहे !'

विशेषतः चांदीच्या सफरचंदाचा उल्लेख बहुतेक जणींनी केला.

— यशवंत रसाची भरलेली कासंडी खाद्यावरून उतरून ठेवीत असतां एक बाई रस पिताना राधाकाकूंना मुद्दाम हाक मारून म्हणाली,

"...तुम्हीं तें चांदीचं सफरचंद ठेवलं आहे ना— गौर झकास दिसते आहे त्यानं ! कुणालाहि हेवा वाटेल तुमच्याजवळची ती वस्तु पाहून ! "

राधाकाकू यशवंताकडे ओझरतें पाहून हंसत उद्गारल्या,

" चांगल्या चांगल्या जिनसांचा संग्रह करण्याचा आम्हां नातेबाईकांत रिवाजच आहे. "

——यशवंताच्या मनांत मग गुऱ्हाळातून रस आणण्यासाठीं खेपा करते-वेळीं हेच राधाकाकूंचे बोल घोळत होते.

——वार्षिक परीक्षा नजीक आलेली, अभ्यास बुडत होता, तरी सकाळ-पासून धावाधांव करून गौर माडली त्यानें.

——चुका, खिळे ठोकण्याचीं बारीकसारीक कामेंहि यशवंत नसला कीं खोळंबून राहात. राधाकाकूंचीं मुलें आंब्याची डाळ, हरबऱ्याची उसळ, पन्हें, रस, यावर ताव मारण्यापलीकडे कांहींच करीत नव्हतीं. गौर सज-विण्याकरिता पेट्या, ट्रंका वगैरे रचून उतरत्या पायऱ्या तयार करणें, नक्षी-दार रुमाल अंथरणे, चित्रें माडणें– सर्व यशवंतानें केलें. विजेच्या विविध-रंगी दिव्याची माळ लावण्यासाठीं त्यानेंच मनुष्य बोलावला.

——गौर विशेष बहारदार व्हावी म्हणून आपल्या घरचें चांदीचें सफरचंद त्यानें, दोन बाजूंस फळांचीं जीं ताटें होतीं त्याच्या मधोमध, उंचावर उठून दिसेल अशा ठिकाणीं ठेवलें होतें.

‘——राधाकाकू आपल्याला नातलग म्हणतात. तसा त्याचा हक्कहि आहे. खरोखरच त्या आपल्या जवळच्या नातेवाईक आहेत.

——आपण त्याना पुण्याला येणारा इसम भेटला कीं त्याच्या हातीं शेतचा भाजीपाला धाडीत होतों, तें त्या आपल्या कुणी आहेत म्हणूनच.

——अशाच माणसाकरवीं राधाकाकूंनीं मला व आईला इथं बोलावलं. कशाला ? माझ्या शिक्षणासाठीं ! त्या वेळीं त्यांची कल्पना असावी कीं माझी आई स्वयंपाकीण म्हणून उपयोगी पडेल, पगार मोजावा लागणार नाहीं, अन् हा यशवंता वरकाम पाहायला आहेच.

——पण आईच्या बाबतींत तरी अपेक्षा फोल झालेली बघतांच राधा-काकू आपल्याला मुदलींच विसरल्या.

——आणि आपलें नातें त्यांनीं आडपडद्यानें का होईना आजच बोलून दाखवलें.’

बरोबर होते यशवंताचे हे अंदाज.

——तो व त्याची सत्तरी उलटलेली म्हातारी आई– सुदेष्णाताई– हीं गरीब होतीं.

आणि गरीबाबरोबरचें नातें मान्य करण्याचें पुष्कळांच्या जिवावर येतें.

त्याना तें हलकेपणाचे वाटते. त्यांची उलट अशी इच्छा असते कीं आपला नातेसंबंध या कंगालानीं कुणापाशींहि प्रगट करूं नये.

राधाकाकू अशापैकींच होत्या.

वास्तविक या नात्याच्या बळावरच, यनंतर व स्वतःचें घर असलेल्या राधाकाकू आपल्याला हातभार लावतील या आशेने, सुदेष्णाताई नि यशवंत यानीं खेडेगाव सोडलें होतें. येताना त्यानीं शेताची धान्यसामुग्री घेतली होती. आपला बोजा कुणावर पडूं नये अशी त्याची मनीषा होती.

* * *

सुदेष्णाताईंचीं बरींच मुलें गेलीं होतीं.

यशवंत एवढाच जगला. त्याचें मन होरपळलें होते. शिवाय दम्याची व्याधि त्यांच्या मागें होती. सदोदित त्या आजारी असत.

यशवंत लहानच तेरा चौदा वर्षांचा.

राधाकाकूंना सुदेष्णाताईंची तब्येत पाहून एकंदर आपत्तिच वाटली. त्या सुदेष्णाताईंना ओळखीनात. एक दिवस देखील त्याना थारा द्यायला राधाकाकू तयार नव्हत्या. एक सबब त्याना सदा उपयोगी पडत असे. तीच त्यानीं या वेळीं बाहेर काढली.

'घरचे मालक दूर गावीं नागपूरच्या बाजूला नोकरी करताहेत...मुलाच्या शिक्षणाकरता मी इथं राहिलें आहें...तिकडच्या संमतीखेरीज तुम्हाला आश्रय देणं गैर होईल...मी तुम्हाला खोली देतें भाड्यानें...'

अन् राधाकाकूंनीं गोवऱ्या, खरीचे गोळे ठेवण्याकरिता त्या वापरीत असलेली जेमतेम खणभर जागा सुदेष्णाताईंना दिली. तिच्यालगतच म्हशींचा गोठा होता व खोलीवर माळा असून त्याला गोठ्याच्या बाजूने शिडीनें जायची वाट होती तिथेंच वैरणीचा सांठा होता.

भाडें दोनच रुपये असल्यानें यशवंत व सुदेष्णाताई तिथें राहिलीं.

यशवंताची आई नेहमीं तापेजलेली; दुखणाईत...तिच्याच्यानें कांहीं होत नसे. तिला यशवंत जेवायला करून घाली. हौदावर आंघोळीला जातांना स्वतःच्या धुण्याच्या कपड्याबरोबर आईचें पातळ तो नेत असे.

लोकात चर्चा होऊं नये म्हणून धोतरासारखीं पाढरीं पातळें त्याने आईला घेतलीं होतीं.

तो इंग्रजी पहिलींत होता. राधाकाकूंच्या मुलाचीं फाटकींतुटकीं पुस्तके यशवंताला मिळालीं होतीं. राधाकाकूंच्याकडे तो देवपूजा करी व तिथेच जेवी.

त्याचा अभ्यास रात्रीच्या वेळीं काय होई तेवढाच. राधाकाकूंच्या ओटीवर विजेच्या दिव्याखालीं तो अभ्यास करीत असे. पण एकदा त्या बोलल्या,

"रात्रीचे दिवे किती जाळतोस...? बिलं भरावीं लागतात आम्हाला!"

तेव्हापासून तो घरातच चिमणीच्या उजेडात दप्तर उघडून बसूं लागला.

यशवंत म्हणजे त्याच्या घरचा एक गडीच झाला होता. प्रत्येक अडल्या-पडल्या वेळीं राधाकाकु त्याला हुकूम फर्मावीत. त्या काम सागत ते दर-डावल्यासारख्या आवाजात. त्याच्या आवाजात मृदुता अशी नव्हतीच.

एकदा राधाकाकूंनीं यशवंताला कुठें निरोप पोचवायला सागितला. मंडई करणे, दळण आणणें, बिरड्या काढणे, इत्यादि कामें व नेहमींची देवपूजा करून धाईनें तो चार घास पोटात ढकलून शाळेत निघाला होता. तो म्हणाला,

"शाळेला उशीर होईल. मधल्या सुट्टीत गेलों तर—"

"जा आत्ताच. आयतं गिळायला मिळतंय —चाबूक दिला खरखरा कीं घोडं वाकतं करकरा!...त्यावाचून तुम्हीं ऐकणारच नाहीं."

—मध्यंतरीं राधाकाकूंचा मुलगा किरकोळ दुखण्यानें आजारी होता तेव्हा त्याच्या कुटुंबाचे डॉक्टर त्याला तपासायला आले होते.

त्यानाच यशवंतानें आपल्या आईची प्रकृति बघण्यास सागितलें.

परंतु जवळच उभ्या असलेल्या राधाकाकू डॉक्टराना उद्देशून बोलल्या,

"अन् तुमचे पैसे कोण भरणार?...मी देणार नाहीं...कांहीं जाऊं नका डॉक्टर!"

मनुष्य कमालीचा स्वार्थी व महत्त्वाकांक्षी असला कीं त्याचा दृष्टि-कोन अतिशय आकुंचित होतो. राधाकाकूंचें तसेंच झालें होतें. वेळप्रसंगीं

मनाचा हलकेपणाही दाखवून दुसऱ्या माणसाचा पुरेपूर फायदा करून घेण्याची मख्खी त्याना पुरतीच साधली होती.

—आणि याच राधाकाकूंच्या गौरीमधें चांदीच्या सफरचंदाची वाखाणणी होताक्षणीं सुदेष्णाताई व यशवंताशीं असलेल्या नात्याचा उमाळा त्याना यावा यांत नवल नव्हतें.

* * *

राधाकाकूंच्याकडचे हळदीकुंकू झाल्यावर एक दिवस सुदेष्णाताई लेकाला म्हणाल्या,

" यशवंत, राधाकाकू माझ्याशीं चांदीच्या सफरचंदाबद्दल मला बोलत होत्या. ...त्याना तें हवें आहे असं दिसतंय्. त्या म्हणतात, ' तुमच्याकडे कधीं होणार गौर ?...शोभेला बरं आहे. विकत द्या थोडक्यात. तुमचं तुम्ही ठरवा. त्या चिमुरड्या यशवंताचा काय विचार घेता ?...' पण मला तूंच थोर ! मीं म्हटलं, ' यशवंत आला की त्याला विचारीन.'

रोज संकटाना तोंड देऊन देऊन यशवंताच्या बालबुद्धीला किंचित् गंभीरपणा आलेला होता. तो म्हणाला,

' आई, तूंच मला सांगत होतीस कीं बडलांच्या चुलतबहिणीनं तुमच्या लग्नात केलेला तो अहेर आहे... बडलांना हे सफरचंद फार फार आवडे. देवानं दिलेल्या बहिणीचं दर्शन चांदीचं सफरचंद पाहिलं कीं त्याना होई...आपला ठेवणींतला जिन्नस, मला वाटतं, आपण गमावूं नये. नवीन कांहीं घेणं होत नाहीं तर आहे तें तरी घालवूं नये...जवळच सोनंरुपं तेवढंच आपल्याला, तें मोडायचं—'

एकदम यशवंत गप्प बसला. वरच्या माळ्यावर वैरणीची चाळवाचाळव होत होती. राधाकाकूंनीं आपलें बोलणें ऐकलें असावें अशी यशवंताची खात्री होती.

कारण त्या दिवसापासून त्यानीं यशवंताला नुसतें धारेवर धरलें. त्याच्या चित्तातला दंश वारंवार दिसून येऊं लागला.

त्याला जेवण उशीरा मिळूं लागलें. शाळेला वेळेवर जाणें जमेना. वर्गात उभें राहावें लागे, अगर छड्या बसत. मग कित्येक वेळा देवपूजा आटोपल्याबरोबर उपाशीतापाशी तो शाळेंत गेला होता.

इतक्याहि हलाखींत यशवंत इंग्रजी पहिलीच्या परीक्षेत उत्तम प्रकारें उत्तीर्ण झाला. त्याच्याच वयाच्या राधाकाकूंच्या मुलाला वरच्या वर्गांत चढवावें लागलें.

राधाकाकूंचा क्रोध प्रज्वलित होण्यास हें देखील कारण झालें.

—आताशा त्याच्या मुलाना तांदुळाचा भात तर यशवंताला कण्याचा भात असा पंक्तिप्रपंच रोज होत असे. शिळेपाकें यशवंतालाच खावें लागे. एकदा आंबूस लागत असलेली पोळी अगदीं खाववेना तेव्हा यशवंतानें टाकली. तशी राधाकाकू सुदेष्णाताईंना म्हणाल्या,

"तुमचा यशवंत माजोरीच फार ! चांगली पोळी वाढली तरी ती पानांत टाकून तो उठला. लोकाना पोळ्या मिळत नाहींत."

—सुदेष्णाताई जेवायला बसल्या कीं माळ्यावरच्या वैरणींत नेमकी खडबड होत असे. सगळा कचरा ताटात पडे. बिचाऱ्या सुदेष्णाताई अंगणात येऊन जेवीत अगर यशवंतानें आग्रह केला तरी वैतागाच्या भरांत तशाच उपाशीपोटी पडून राहत.

इतकें असूनदेखील राधाकाकूंच्याविषयीं यशवंताला आपुलकी वाटे. त्यांच्याप्रमाणें आपल्या उपयोगीं कुणीच पडलें नसतें अशी त्याची भावना होती.

आई बरी व्हावी यासाठीं घरचें धान्य विकून यशवंत दवापाणी करूं लागला.

—चार महिने घराचें भाडें थकलें. राधाकाकूंनीं तगादा लावला.

एक दिवस अगदीं वर्दळीवर येऊन त्या म्हणाल्या,

"फुकट राहायला पाहिजे दुसऱ्याच्या जागेंत ... जशी मेल्यांच्या बापाची पेंड आहे. सुदेष्णाताई, भाडं चुकतं करा. नाहीं तर—हो—" त्य काहींसें आठवल्यासारखे करून म्हणाल्या, "ते चांदीचं सफरचंद गहाण ठेवा......भाडं दिलंत कीं परत करीन. तर तुम्हाला राहतां येईल... पाहा आपला विचार."

या सूचनेवर सुदेष्णाताई व यशवंत यांच्यामध्यें बरीच भवति न भवति झाली.

यशवंत कबूल नव्हता. पण त्याची आई म्हणाली,

"बाळा, आपण अजून कुठूनच पैसे काढले नाहींत. कुठं मागायला जातोस? देऊन टाकतें सफरचंद. पुढं मागं घेऊं सोडवून. गहाण म्हणजे विकणं नव्हे...तुझ्या वडलानीं शेती राखून चांदीचं सफरचंद तरी ठेवलं... आपले दिवस कसे जातील ... देवा ... रोजच्या या कचकचीनं माझं आयुष्य कमी होतंय...मला जगावंसं वाटतं... कारण तूं... चांदीचं सफरचंद ही त्याची आठवण—पण तूं चालतीबोलती आठवण–कुळाचा तंतु...तूं तें सोडवशील...दे आत्ता..."

सुदेष्णाताईंना एकाएकीं खोकल्याची ढास आली.

—राधाकाकूंच्या हातीं चांदीचं सफरचंद देताना यशवंताचे हात थरथरत होते. त्याचे हृदय जोरानें स्पंदन करीत होतें. परस्परविरुद्ध विचारांचें काहूर त्याच्या बालमनांत माजलें होतें.

सफरचंद मिळाले तरीहि भाडें न देण्याबद्दल राधाकाकूंच्या तोंडचा पट्टा चालूच राहिला.यशवंताची देवपूजाहि त्यांनीं काढून घेतली. हल्लीं तो दोन्ही वेळा घरींच जेवीत असे.

—अखेरशेवटीं नाइलाजानें यशवंतानें शेजारच्या बोळात कचऱ्याच्या पेटीजवळ एक लहान खोली स्वल्प भाड्यात घेतली.

* * *

म्हाताऱ्या सुदेष्णाताईंचा दम्याचा विकार दिवसेंदिवस बळावत चालला होता. दुखणें झपाट्यानें वाढत होतें. आसपासचें वातावरण आरोग्याला शक्य तेवढें विघातक होतें.

चोहोंकडे काळाकुट्ट अंधार, आकाश काळ्या ढगांनीं व्यापलेलें, विजेचा प्रकाश राहिला बाजूला पण विजेचे धक्के मात्र यशवंताच्या मनाला बसत होते.

रोज वात होऊन सुदेष्णाताई बडबडत. यशवंताच्या कोवळ्या अंतः-करणात कांपरें भरे. भेदरून तो आसपास आसऱ्यासाठीं धांवे; पण जो तो त्याला टाळी.

कारण यशवंत कर्जानें ग्रासलेला होता. सगळ्या तोंडओळखीच्या माणसांपासून यशवंतानें छोटींछोटीं कर्जे काढलीं होतीं. तीं देण्याची प्रामाणिक इच्छा असूनसुद्धां वेळच्या वेळीं यशवंताला त्यांतला छदाम

फेडता आला नव्हता. त्यामुळें शेजारीपाजारी त्याला मनास वाटेल तें बोलून हैराण करीत. एकजण उपहासाच्या स्वरांत म्हणाला,

" अरे यशवंता, तूं फक्त नावाचा यशवंत, एरवीं पक्का अपेशी. "

हीं असलीं मर्मभेदक बोलणीं यशवंत कशीं सहन करीत असेल ?

—परिस्थिति सारें शिकवते.

रात्रीं बारा एकचा सुमार.

—ती काळरात्र ठरली.

आईचे हातपाय चेपीत असतानाच ते गार गार पडत चालले. चमकून यशवंतानें नाकाशीं सूत धरलें. कांहींच हालचाल दिसेना.

त्याच्या डोळ्यातून अश्रुबिंदु गळूं लागले. यशवंत किंचाळला. तो हतधैर्य झाला.

आतापर्यंत भयाण, भीषण रात्रींत आईची तरी त्याला सोबत होती. तिची त्याला पाखर होती. जगानें मारलेल्या शाब्दिक माऱ्यानीं विव्हळ झालेल्या यशवंताच्या अंतःकरणाच्या वेदना आईच्या कुशींत तो शिरला कीं कोठल्या कोठे नाहींशा होत.

तोहि आसरा अचानक नष्ट झाला. यशवंत उघडा पडला.

म्हाताऱ्या सुदेष्णाताईची प्राणज्योत निवून गेलेला देह चिमणीच्या उजेडांत भेसूर दिसत होता.

किंचित्काळ यशवंतानें शोक केला. मग त्यानें डोळे पुसले. रोज दुःख, रोजच्या यातना, हालअपेष्टा, —रडायला डोळ्यात पाणी शिल्लक हवें ना !

त्याच्या मनापुढें आता एकच प्रश्न उभा राहिला.

—आईच्या अंत्यविधीची व्यवस्था कशी करायची ?

जवळच्या एक-दोघाना त्यानें हाका मारल्या. निरनिराळ्या सबबी सागून प्रत्येकाने त्याला प्रत्यक्ष मदत करण्याची टाळाटाळ केली.

तो मग राधाकाकूंच्याकडे धांवला. तेवढेंच काय तें विसाव्याचें ठिकाण त्याला वाटत होतें.

पुष्कळ वेळ दरवाजाची कडी वाजल्यावर दिंडीचें दार किलकिलें झालें. कुणीतरी बाहेर डोकावलें.

" येशा !" राधाकाकूंचा तो स्वर होता. " का रे आलास ? अपरात्रीं आमची झोंपमोड करतोस ? ... अरे, असा शनीसारखा कां मागं लागला आहेस आमच्या ? तुला इतके दिवस मदत केली हा आमचा गुन्हाच झाला म्हणावयाचा !"

" राधाकाकू, अर्धा तास झाला असेल— माझी आई देवाघरीं गेली— हो...कसं करूं ?"

यशवंताचं उभं अंग कापत होतं. ही दुःखदायक बातमी ऐकून राधाकाकूंच्या मनात सहानुभूति उत्पन्न होईल अशी त्याची कल्पना होती.

तो पुढे बोलला, " जवळ फुटकी कवडी नाहीं. मला अनुभव नाहीं अशा भयंकर प्रसंगाचा...तुमच्या मुलाना पाठवता ?...आम्हीं सगळ्याची व्यवस्था करू— मी एकटा काय करणार ?..."

यशवंताची स्थिति—त्याचा त्या वेळचा स्वरोच्चार—हे सर्व असे होतें कीं दगडालादेखील पाझर फुटता—पण राधाकाकूंच्या मनाला—

नाव कशाला ! त्या कडाडल्या,

" भिकारड्या ! माझी पोरं दहशत खातील. त्यानींच काय. मीं सुद्धा अजून माणसाचं प्रेत असं पाहिलं नाहीं."

" बरं, पैसे देता का थोडे ?—मी फेडीन."

" म्हणे मी फेडीन— " राधाकाकू वेडावीत म्हणाल्या, " मागचं भाडं फेडलंस तसच ना ? आजूबाजूचीं माणसं ओरडताहेत तुझ्या नांवानं. ...बुडव्या म्हणतात...हळदीकुंकवाच्या वेळीं रंगीत दिव्यांची माळ बसवायला माणूस आणलास. त्याच्याकडून पैसे काढलेस...तो म्हणाला, ' यशवंताची मावशी आहात तुम्ही.' मीं साफ सांगितलं, ' त्याच्याकडचं कुण्णी मेलं तरी मला सुतक लागायचं नाहीं. '......मामेमावशी, आतेमावशी, खेडवळाना हें अगदीं घरचं गोत वाटायचंच. हवीं तीं नातीं लावून लग्गे साधायचे धंदे रांडिच्याचे !"

" नका अशा निर्दय होऊं राधाकाकू...आईच्या औषधपाण्याला झाला थोडा खर्च...वीस रुपये द्या...काय वाटेल तें करून मी ते फेडीन. तुमच्या अशीर्वादाशिवाय दुसरं दैवत मला नाहीं...इतक्या दिवस माझं उदरपोषण तुम्हीं केलं...मी मजूर म्हणून तुमच्या घरांत राबेन...अशा

रात्रीं कुणाकडे जाऊं मी ? हें काम तुम्हाला सहज होण्यासारखं आहे."

"जा बाबा. उगीच शब्दानं शब्द वाढवूं नकोस." राधाकाकू दिंडी लावूं लागल्या.

"नको हो, –दया करा माझ्यावर..."

पण दिंडीचे दार मिटलेंच.

निराश मनाने यशवंत परतला.

"यशवंत, अरे यशवंत—" कुणी हाका मारीत होतें.

यशवंत मागें वळला. राधाकाकूंचा आवाज येत होता. तो तसाच माघारीं फिरला.

"आपलं मनुष्य आहे...नाहीं उपयोगी पडलं तर जग तोंडावर थुंकेल..." राधाकाकू दरवाजा पूर्णपणें उघडून बाहेर येऊन बोलत होत्या, "तें चांदीचं सफरचंद गहाण आहे माझ्याकडे...तें विकत देतोस ? दहा रुपये मिळतील."

यशवंत घुटमळत उभा राहिला. त्याचं मन सांगत होतं,

'नको देऊस ! तुझ्या वडलाची स्मृति ...घरातला एकुलता एक भारी जिन्नस...आज तो गहाण आहे...हिंमत आहे तुझ्यात...उद्यां तो तूं खास सोडवून आणशील...'

पण हीं भविष्यकाळांतील गोंडस स्वप्नें होतीं. वर्तमानकाळ भुतासारखा थैमान घालीत होता. माणसाला पुष्कळदा पुढें पैसे मिळतील ही खात्री असते; पण तितकं थांबायला अवधि नसतो.

राधाकाकू दरवाजाची एक फळी लावीत म्हणत होत्या,

"विचारात कसल्या पडला आहेस ? बोल, मला पेंग येत आहे... दुपारीं झोंपलें नाहीं मी आज—"

दरवाजाची दुसरीहि फळी लागली जात असता यशवंत लाचार स्वरात म्हणाला,

"घ्या ते राधाकाकू. द्या मला दहा रुपये...कुणीच खांदा द्यायला येत नाहीं...एक बैलगाडी आणतों. तींत आईला टाकतों...पण न्यायचं कुठं...करायचं काय...मला समजत नाहीं हो."

"ते विचार आणखी कोणाला. पैसे देते मी. तेवढं कर्तव्य बजावतें... इथंच थांब थोडा."

अन् राधाकाकू आत जाता जाता मनात म्हणत होत्या,

"ही जरत्कारू सुदेष्णाताई आजपावतर माझ्या घरात असती तर हें संकट चुकत नव्हतं...रिकामी ब्याद...!"

यशवंताला दहा रुपये देऊन राधाकाकूंनीं दरवाजाला आतून कडी घातली.

* * *

बाहेरच्या भयानक काळोखात यशवंत रस्ता फुटेल तिकडे कांहीं काळ चालत राहिला. त्याचीं पावलें जड पडत होतीं. चित्त भ्रमल्यासारखें झालें होतें.

राहून राहून त्याचं दुखावलेले मन म्हणत होते,

'आई गेली...वडिलांची स्मृति पण गेली...चांदीचं सफरचंद..."

---

# कोंडलेली वाफ ! : : ३

साप-मुगसाचें सख्य असलेले पाहून सदू फैलवाल्याला जितकें आश्चर्य वाटलें नसतें तितकें तें भाई रघुवीरची न् घोरपडी स्टेशनजवळच्या एका कारकुनाची घसट बघून वाटलें.

घोरपडी स्टेशनच्या हद्दींत सदू चांगलाच माहितगार होता. रेल्वे रस्ता सतत दुरुस्त ठेवण्यासाठीं कांहीं मजुरांच्या टोळया नेमलेल्या असतात, त्यांतील म्होरक्याला फैलवाला अगर गँगमन म्हणतात. रुळांचे सांधे नीट आहेत का नाहींत तें पाहणें, रेल्वे मार्गावर खडीचे थर पसरणें, असलीं कामें करणाऱ्याच्या गटातील सदू फैलवाला हाच काय तो कॉंग्रेसचा कट्टा सेवक होता. युनिअनची वर्गणी कोणींहि भरली नाहीं तरी तो भरीत असे. तेथील युनियनचा बावटा त्याच्यामुळेंच नेहमीं फडकत राहिला होता. इतर रेल्वे मजुरांची मनें वळवून त्यांना रेल्वे कामगार संघाचे सभासद सदूच करून घेत असे.

—कारण अशिक्षित मजुरांच्या अनेक तक्रारी होत्या. रेल्वेच्या कारभारात त्यांच्या हिताकडे कोणीच पहात नसे. त्यांना धोक्याच्या कामगिरीच्या मानानें पगार कमीच मिळे. त्यांचें हजेरी पुस्तक नीट भरलें जात नसे. त्यांना राहायाला देण्यासदेखील रेल्वेखात्यापाशीं पुरेशा खोल्या नव्हत्या.

ही युनियनची गाऱ्हाणीं रास्त असत. सदू फैलवाल्याला त्यामुळे मरमकून पाठिंबा मिळे.

—आज अशीच जवळ जवळ तीन रुपये वर्गणी सदू फैलवाल्याने जमा केली. कामगाराचा पगार झाल्याबरोबर त्यानें ही वसुली केली होती. भाई रघुवीरनें त्याला वर्गणी घेऊन लगेच बंगल्यावर बोलावलें होते.

सदू युनियनच्या कामात मुरब्बी होता. त्याने कधीं भाषण केले नाहीं. परंतु भाषणाआधींची सारी तयारी त्याचीच असे. घोरपडी भागात युनियनच्या कामाचे त्याच्यावाचून सदाच नडे.

सदूच्या मनात बंगल्यावर जाता जाता विचार चालले होते,

'या रघुवीरचं संपफोड्यांशीं संघटन वाढतं आहे. घोरपडी स्टेशनवर कारकुनांचा भरणा थोडाच; जवळ जवळ पावणेदोनशें लोकात वीस पंचवीस एवढेच लेखणीवाले. तो देसाई, एंजिन दुरुस्तीच्या खात्यातला नंबर टेकर, इथे स्टेशनावर उतरण्याच्या सोईन लावणं हे त्याचं काम. त्याचा पगार दरवर्षी चढतो आहे; हे भाई रघुवीर असं का वागतात या फितुऱ्याशीं ? ''

त्याची न् भाई रघुवीरची अलीकडे मोकळेपणाने गाठच पडत नसे. गावोगावच्या पुढाऱ्याना भेटण्यात वर्तमानपत्राच्या बातमीदारांशीं कानगोष्टी करण्यात रघुवीर चूर असत; यानें कार्याचा प्रचार होतो असें त्या भाईचें म्हणणें होतें.

शिवाय भाई रघुवीर म्हणजे बडे प्रस्थ ! स्टेशन विभागाच्या असिस्टंट सर्जनचा मुलगा ! ! फर्स्ट एम्. बी. बी. एस्. ला तीनदा टल्ले खाऊन भाईवादाकडे रघुवीर वळले ! ते काहीं तासात कार्ल मार्क्स न् काहीं मिनिटात लेनिन झाले होते !

रघुवीरच्या नावाचा बोलबाला सदूमुळेच झाला. संघटनाचतुर, कार्यक्रम यशस्वी करणारे अशी रघुवीरांची ख्याति होती. याचें सर्व श्रेय वास्तविक सदू फैलवाल्याकडे जात होतें; परंतु खुद्द सदू अबोल कार्यकर्ता असल्यानें खऱ्या परिस्थितीची कोणालाच कल्पना नव्हती.

सदूला भाई रघुवीरशीं खुल्या दिलानें पुष्कळ बोलायचे होतें. जमल्यास ही वर्गणीही तो खर्चासाठीं मागणार होता. आताशा सदूला कणकण येत

होती. कुठें तरी प्रकृति दाखवावी असें त्याला वाटत होतें. इतर मजु-राच्या अडचणी सुद्धा या तीन रुपयात भागवाव्यात, व आणखी रक्कम रघुवीराकडून घ्यावी असें सदूला वाटत होतें.

—तो बंगल्यांत शिरला. भाई रघुवीर वारंवार खोलीच्या खिडकीशीं येतच होते. ते टेहळणीवर होते. ते चट्दिशीं पोर्चमध्येंच त्याला भेटले—

" चला तुमच्या खोलींत. मी वर्गणी तिथं देतो तुम्हाला." सदू म्हणाला.

रघुवीर किंचित् नाखुषीनेंच त्याला घेऊन खोलींत गेले.

तेथे काहीं मुलीमुलें होतीं. तें अभ्यासवर्तुळ होतें. भाई रघुवीर मधोमध बसून व्याख्यान देत असावेत. त्याच्या पुढ्यात एक लठ्ठ पुस्तक होतें.

सदू अशिक्षित होता; तो ओशाळल्यासारखा उभा राहिला. रघुवीरा-च्या खोलींत कोणी नसेल ही त्याची अटकळ चुकीची ठरली.

भाई रघुवीरांनीं त्याच्याकडे पुढारीपणाच्या तोऱ्याने पाहात विचारले,

" काय रे, आणलीस वर्गणी ? "

" हो...हे तीन रुपये..." सदूनें खमिसातील पैसे काढून दिले.

" आण इकडे...पावती पुस्तकात मी नोंदतों." रघुवीर झट्दिशीं पुढें येऊन वर्गणी घेत म्हणाले.

सदू घुटमळत उभा राहिला. त्याला वाटलें शाबासकीचे दोन शब्द मिळ-तील. आपली या नवीन राजकारणांत पडणाऱ्या पोरांशीं ओळख होईल.

तेथें चहा पिऊन रिकाम्या झालेल्या कपबशा दिसत होत्या...

आपलंही असंच स्वागत होईल ?

पण छे !

" जा आतां. मी यांना धडे देतोंय्—हं. कुठपर्यंत आलं? काय म्हणतो एंजल्स ? " रघुवीरांनीं सुरुवात केली.

सदू बाहेर पडला न पडला तोंच ' कोण हा ! ' असा एका मुलीचा मंजुळ सवाल सदूच्या कानीं पडला.

त्याची गति आपोआप थंड झाली. रघुवीर गौरवाच्या शब्दात आपली कशी ओळख करून देतात हें ऐकण्याची त्याला आतुरता होती. आपली स्तुति मनसोक्त होईल अशी सदूची खात्रीच होती. भाई रघुवीरांचें नाव

वर्तमानपत्रांत झळकत होतें याचें कारण सदूच— तोच खरा हमाल मजुरांचा पुढारी होता. भाई रघुवीर सदूचा सदुपयोग हरतऱ्हेनें करून घेत असत. त्यानेंच रघुवीरबद्दल रेल्वे कामगारांत उत्तम ग्रह निर्माण केला होता.

पण—?

सदू एकदम चिडला.

त्याच्या कानावर शब्द आले,

'हा सद्या—आमच्या युनियनचं हपिस आहे तिथला ऑफिस बॉय् ! माझ्याविषयीं त्याला आदर वाटतो त्यामुळं थोडासा राबतो !'

—सदूच्यानें ऐकवेना, त्यानें हाक मारली,

"रघुवीर—"

"काय रे? अरे पुन्हा कां आलास?" रघुवीर ताबडतोब खोलीच्या दारातून डोकावले.

"पोटाला चिमटा घेऊन युनियनकरता मीं वर्गणी जमवली.... मला बरं नाहीं आताशा....पैसे वापरायला मागणार होतों; इतकं मी करतों न् तुम्ही ."

भाई रघुवीरनें एकंदर रोख ओळखला. तो लगेच म्हणाला—

"अरे, असा घाबरतोस का ?...माझे वडील असिस्टंट सर्जन आहेत ना याच भागात ? रजा देतों तुला— सिकात जा !"

सदूचें तोंड गप्प झालें. कधीं तरी रघुवीराचा आपल्याला असा उपयोग होईल अशी त्याची खात्री पटली. त्याचा राग शांत झाला. तो निघून गेला.

अतिशय अंगमेहनत— पैशाची ओढघस्त स्थिति— सदू फैलवाल्याला शारीरिक न् मानसिक असा दुहेरी त्रास पडे. आपल्या प्रकृतीकडे लक्ष द्यायला त्याला पैशाची सवड झाली नाहीं. फावला वेळ तो युनियनचीं कामें करण्यांत घालवी.

दुर्लक्ष केल्या गेलेल्या अंगांतील कचकचीनें उग्र स्वरूप धारण केलें.

सर्व अवयव ठणकत होते; सदूला रजा हवी होती; त्यासाठीं असिस्टंट सर्जनच्या दाखल्याची जरूरी होती.

सदूला बहुतेक रात्रपाळीच मिळत असे. इतराच्या सुखदुःखाकरितां

झटणारा सदू रेल्वे अधिकाऱ्यात अप्रिय होता. त्याच्या प्रयत्नानें हमाल-पोर्टरना सवलती देण्यांत येत असत; पण सदूचे मात्र हाल होते.

तिबना चालवत नव्हतें तरी सदू खोळंबत दवाखान्यात गेला.

कापडाच्या पडद्याआड एका कारकुनाचा आवाज येत होता– सदूनें ऐकलें. त्याम देसाई नंबर टेकरच ते !

"तुमच्या मुलाची न् माझी ओळख आहे; आता बंगल्यावरून आलों कीं तुमच्या–फर्स्ट एडच्या परीक्षेसाठीं–पाचशें रुपये देणार आहें मी;—सध्या भावाचं लग्न आहे, रजा द्या; सिकात जातों, दाढी वाढवतों, रोज ऑफिस नेईन. फर्स्ट एडचं तेवढं जमवा, गार्ड व्हायचं आहे !"

"थांबा. मी बंगल्यावर फोन करतो."

"हॅलो, हॅलो..."

जरा वेळानें रिसीव्हर खालीं ठेवल्याचा आवाज झाला. 'तुम्ही देसाई ना? अच्छा ! हा ध्या दाखला; पोरगा माई आहे; कॉंग्रेस मंत्रिमंडळ आहे, कडक निर्बंध नाहींत, तंवर ठीक चाललं आहे. पुढं त्याला नोकरी-ला लावायला पाहिजे. अशीं कांहीं कामं मुलाच्या हातीं कळवलींत तरी चालतील; 'फर्स्ट एड'ची परीक्षा उतरल्याखेरीज गार्ड होता येत नाहीं: माझ्या हातात आहे तें. बरं.'

—देसाई नंबरटेकर सदूपुढूनच गेले.

रजा मिळणार अशी सदूची खात्री होती; त्याचें अंग भाजत होतें, हा दुखण्याचा चालता बोलता पुरावा; शिवाय माई रघुवीराशीं दाट ओळख!

सदू कापत कापत आत गेला.

"साहेब, ताप—" त्याला पुढें बोलवेना.

"काय पाहिजे !" सिव्हिल सर्जननें दरडावून विचारलें.

"माई रघुवीराना विचारा. त्याच्यातर्फे मी आलों आहें."

असिस्टंट सर्जननें फोन केला.

"कोण, कुणी नाहीं–ऑफिस बॉय...असे पुष्कळ तुझ्याबद्दल आदर बाळगत असतील, होय ना ? काय ? बेळगांवला दौऱ्यावर जाणार आज रात्रीं...अं !'

अंसिस्टंट सर्जननें रिसीव्हर खालीं ठेवीत म्हटलें, " खोटं बोलतोस ! माझ्या मुलाचा तुझ्यासारख्या फडतुसाशीं दाट परिचय ? चल, नीघ. लफंगा दिसतो आहेस ! चोऱ्या करायला रजा हवीय् खोट्या ओळखी सांगून ! "

" साहेब ! "

" चल इथनं. "

टेबलावरची घंटा जोरजोरानें दाबली जातांच सदूची उचलबांगडी होण्यास किती वेळ लागतो ?

वाटेंत उन्हाच्या तिरिपेनें सदूला मूर्च्छा आली. बायकामुलांनीं अर्ध्या वाटेंत येऊन सदूला घरीं नेलें.

थोडीशी विश्रांति घेऊन त्याला रात्रपाळीला जायचें होतें.

त्याच्याच्यानें काम होत नव्हतें. सदूच्या मनाला जबर धक्का बसला होता !

" कुणीही सागेल कीं माझी पायरी हपीसबॉयहून वर आहे. माझी वाणी शुद्ध आहे...युनियनसाठीं एवढा राबलों ! भाई रघुवीरनीं मला माणुसकीनं वागवायचं होतं; दोघेचजण असलों कीं मोठेपणा देऊन, देशाची सेवा म्हणून कष्ट करून घ्यायचे न् चारचौघात...मी चपराशी, गडी ! "

सदूचें डोकें भणभणत होतें.

रेल्वेरुळापाशीं तो काम करीत असतानाच गाडी आली—

सदूचा झोंक गेला—

कामगारानीं त्याला मागें ओढलें. पण सदूचे दोन हात सांपडलेच !

त्याअगोदर अपघातामुळें गाडी थाबली. एंजिनच्या कोंडलेल्या वाफेनें जोरजोरांत आवाज केला— अत्यंत आनंद झाल्यासारख्या शिट्या कर्कश-पणानें वाजूं लागल्या !

" अय्या रघुवीर...तुमचा ऑफिसबॉय्. " फर्स्ट क्लासमधून बेळगांवाला

दौऱ्यावर निघालेल्या भाईंना कुणीं तरी मंजुळ आवाजांत म्हटलेलें सदूनें ऐकलें.

× × ×

असिस्टंट सर्जन तपासायला खाटेपाशीं आला तेव्हा त्याला मारायला सदूचे हात शिवशिवत होते.

पण रक्त येईपर्यंत दातओंठ खाण्यापलीकडे सदू कांहींच करूं शकत नव्हता !

× × ×

प्रांतिक मंत्रिमंडळानें राजिनामा दिला त्याच सुमाराला घोरपडी कामगारसंघाचा समग्र अहवाल प्रसिद्ध झाला. या अहवालात वर्गणी किती आली त्याची नोंद आहे; सभा-समारंभाना खर्च झाला त्याचा बारीकसारीक तपशील आहे; युनियनचीं सम्मेलनें झालीं, त्यांचीं थाटाचीं वर्णनें आहेत; अगदीं प्रारंभालाच अर्ध्या पानाची जागा रेल्वेकामगाराचे पुढारी भाई रघुवीर यांच्या छायाचित्रानें व्यापली आहे– ओळीगणिक या ना त्या निमित्तानें रघुवीराच्या नांवाचा उल्लेख आहे.

पण बायकामुलांसुद्धां भिक्षा मागत असलेल्या थोटया सदू फेलवाल्याचा इतिहास कोठेंच नाहीं ! त्याच्या नांवाचा मागमूस सबंध अहवालात नाहीं ! प्रत्यक्ष कार्य करणारी अभेद्य शक्ति अशी कोंडलेली वाफ सदूच्या अंतःकरणात होती. तिनें सदूच्या शरीराच्या चिंधड्या उडवल्या. जगात असून नसल्याप्रमाणें त्याची अवस्था करून टाकली.

—आणि भाई रघुवीर मात्र केवळ तोंडाच्या वाफेनें अग्रगण्य देशभक्त गणले गेले ! ! !

# रंगदास चांभार : : ३

कचोपंताचा चंद्रराव किंवा लहानगा चंदू गावात काहीं कमी हिंडत नसे. आसपासच्या पोरांसमवेत तो खेळे. आई कोणाच्या घरीं बसायला म्हणून अगर कोठें देवाला म्हणून गेली, तर चंदू तिच्याबरोबर हटकून जाई. कचोपंत, बाजारच्या दिवशीं अथवा दुकानात काहीं खरेदी करण्याकरिता पठेंत गेले तर, चंदूला घेऊन जात असत.

चंदूच्या पुष्कळाशीं ओळखी होत्या. बरोबरीच्या मुलाशीं तो • नित्य खेळतहीं असे. पण हे सवंगडी ब्राह्मणगल्ली, फार फार तर मराठा आळी, यापलीकडे नव्हते. महार अगर चाभारवाड्यातील मुलाशीं चंदूचा किंवा त्याच्या सोबत्याचा कधींच संबंध येत नसे. शाळेंतदेखाल तीं बिचारी इतर मुलापासून अलग बसत. त्याचा कोणाला कसलाच संपर्क पोहोचत नव्हता.

म्हणूनच चंदूचा व रंगदासाचा केव्हाही परिचय होण्याचा योग ते उभयतां मराठी शाळेंत असताना आला नाहीं.

पुढें इंग्रजी शिकण्यासाठीं चंदू शहरगावीं बोर्डिंगात राहिला. पहिल्याच वर्षी सुटींत प्रश्नपूरला येतांना त्यानें एक पतंग बरोबर आणला होता.

शहरात तो वावडी उडविण्यात पटाईत झाला होता. कित्येकाच्याहून त्याचा पतंग उंच जात असे.

आता त्यानें मुद्दाम बरोबर आणलेल्या पतंगावर त्याचें विशेष प्रेम होतें कारण या पतंगाला लावलेल्या मांजानें त्यानें दुसऱ्या कित्येकांच्या वावड्या भरकटत लावल्या होत्या.

प्रश्नपुरात आल्यावर पहिल्याच दिवशीं त्यानें एक उंच पतंग आकाशात विहरतांना पाहिला. लागलीच चंदूला स्फुरण येऊन त्यानें आपली वावडी उडविली. दोनही पतंगांची टक्कर झाली. मांजाला मांजा बराच घासला गेला. सरतेशेवटीं चंदूची वावडी तुटून कोठें पडली. प्रतिस्पर्ध्यांची वावडी जोरानें उडतच होती.

चंदूला कोणीं आपला पतंग कापला हें पाहण्याची उत्कंठा झाली. तेवढ्यासाठीं त्यानें सबंध प्रश्नपूर धुंडलें. फिरतां फिरतां तो चांभारवाड्यांत आला. तेथें एक त्याच्याचएवढ्या वयाचा मुलगा पतंग उडवीत होता.

त्याची ओळख करून घेण्याची चंदूला इच्छा झाली. त्यानें त्या मुलाला विचारलें, " तुझें नांव काय ? "

" रंगदास. " तो मुलगा उत्तरला.

मग रंगदासानें जरा वेळानें प्रश्न टाकला,

" तुला काय म्हणतात ? "

" चंदू. "

नंतर रंगदासाला चंदूनें आपलें घर पहावयाला म्हणून नेलें.

दोनही मुलें बागडत, गळ्यात गळे घालून गेलीं.

पण चंदू रंगदासाला घेऊन माजघरापर्यंत गेला न गेला तोंच कचोपंत कडाडले, " चंद्या, सोड त्याला आधीं ! "

अन् मग ते रंगदासाच्या अंगावर वस्कन धावून जात म्हणाले, " काय रे चांभारड्या, नीघ इथून; याद राख पुन्हा चंदूबरोबर दिसलास तर. कंबरडं मोडीन बघ ! "

मुलें एकमेकांपासून बाजूला झालीं. रंगदास दुसऱ्याच क्षणीं मागें न पाहता सोसाट्यानें पळून गेला.

आणि याच वेळीं रंगदासाला प्रथमच विटाळचंडाळाची समजणूक झाली.

× × × ×

प्रश्नपूर हें एक छोटेंसें खेडेगांव होतें. वस्ती कांहीं फार नव्हती. पंधराशें-दोन हजार इतका उंबरा असेल अधिकांत अधिक. असल्या खेड्याकडे वास्तविक कोणी शहरवासी चुकून सुद्धां डोळा वळवायचा नाहीं; तसाच कोणाचा विशेष नातेसंबंध असला तर कोर्ट-कचेऱ्यांच्या अगर कॉलेजच्या सुटीच्या दिवसात कोणी यायचा व ' करमत नाहीं बुवा ' ' कसा वेळ घालवावा तेंच समजत नाहीं ' इत्यादि वाक्यें उच्चारीत चार-दोन दिवसांत पुन्हा माघारीं फिरायचा !

परंतु सुदैवानें प्रश्नपूरची स्थिति अशी नव्हती. त्याच्याजवळ एक सुंदर तलाव होता. मोठें गाजलेलें ठिकाण होतें तें ! लांब-जवळची किती तरी मंडळी तलाव पाहण्यास मुद्दाम सवड काढून येत. अशाना प्रश्नपूर हेंच उतरण्यास सोईस्कर गांव असे. तेथेंच धर्मशाळेंत किंवा कोठें तरी ओळख काढून ही मंडळी मुक्काम ठेवीत, एखादा वाटाड्या मिळवीत, अडीच-तीन मैल पायीं अथवा बैलगाडींतून तलाव पाहण्यास जात व तलाव आणि त्यामोंवतालचें लावण्य पाहून धन्यवाद गात गात पुन्हा परत फिरत.

ही गोष्ट येथें मुद्दाम सांगितली पाहिजे कीं, चांभार अगर महार-समाजांत या हौशी व रसिकांच्या येरझाऱ्याची कोणालाच विशेष थाग नव्हती. पोटासाठीं अखंड खस्ता खाणाऱ्या गात्रांना आनंदासाठीं सृष्टिसौंदर्याची आठवण कोठून होणार ?

नाहीं म्हणायला सरकारी अंमलदार कधीं आले, तर गावचा निरोप्या जो महार त्याला वाटाड्या म्हणून त्याच्याबरोबर जावें लागे.

× × ×

रंगदास आतां त्याच्या कुटुंबांतील कर्ता पुरुष झाला होता. खालच्या वर्गातील एक झोंपडी म्हणजे एकखांबी तंबू कधींच नसतो. चारी दिशांच्या असंख्य तणाव्यांनीं त्या तंबूची उभारत झालेली असते. त्या दृष्टीनें रंगदासाचे धाकटे दोन भाऊ व म्हातारे आई-वडील हेही दिवसभर कष्टत होते. चांभारीच्या धंद्यात वाकबगार असूनसुद्धां रंगदास कधीं फार पैसे मिळवूं शकला नाहीं. त्याला दुधाच्या व्यवस्थेकरितां घरीं एक शेळी ठेवावी लागली; इतर मिळकत थोडीफार व्हावी म्हणून त्यानें कांहीं कोंब-

ड्याही बाळगल्या, एवढेंच नव्हे तर एकाचें वावरही तो खंडानें करीत असे.

इतकें जरी होतें, तरी चांभारी हा रंगदासाचा मुख्य धंदा होता. त्याकरितांच तो रात्रंदिवस झटे. वहाणा व जोडे आसपासच्या गावीं बाजारच्या दिवसांत विकायला नेणे, शेतकऱ्याना नवीन मोटा करून देणें, त्याच्या जुन्या मोटाची दुरुस्ती करणें, बैलाचे चाबूक करून विकणें या त्याच्या धंद्यांतल्या असंख्य लहानसहान बाबी होत्या. आपला माल खपावा म्हणून तो फार श्रम घेई. धंद्यातल्या प्रवीणतेखेरीज आणखी एक रंगदासाचें वैशिष्ट्य होतें. तें म्हणजे नेहमीं नवीन गोष्टी ग्रहण करण्याचें. कोणतीही बाब, मग ती कितीही अलीकडची असेना, त्याला ती चटकन् आकलन होत असे. त्यानें शहर कधीं पाहिलें नव्हतें, पण शहरातलीं जीं जीं म्हणून पादत्राणें त्याच्या नजरेखालीं आलीं होतीं, तीं तीं करून पाहण्याचा त्यानें यशस्वी प्रयत्न केला. रंगदासाशिवाय दुसऱ्या कोणच्याही चाभाराला अजून हें कसब साधलें नव्हतें.

पण आपल्या इतक्या राबणुकीला किंमत येत नाहीं, चरितार्थासाठीं आपणाला इतर उद्योग करावे लागतात, याचा रंगदासाला अत्यंत उद्वेग वाटे. या खेदाच्या भरातच आईनें किंवा बापानें त्याच्या लग्नाची गोष्ट काढली, तर रंगदास ती गोष्ट धुडकावून लावी. एकदा तो म्हणाला होता,

"लग्नानंतर एक मनुष्य आपल्या कष्टातला वांटा उचलायला येईल हे खरें पण मेहनतीच्या भावाला पैसा कोठें विचारतो आहे ? आपण चाभार, कातडीं उलथींपालथीं करणारे; म्हणून गावातले लोक आपल्याला दृष्टीसमोरही वागवायला तयार नाहींत; काहींजण आपली सावली पडली, तर विटाळाने न्हाऊन निघाल्यासारखे समजतात याचं मला परवापर्यंत फार दुःख होत असे; पण आतां धंद्याची गोडी लागली; चाभारकी हें एक कसब आहे असें वाटूं लागलें व मी गावांतल्या लोकांच्या विटाळ-चंडाळाची खिसगणती करीनासा झालों; आपण चांभार आहोंत याचा अभिमान धरूं लागलों. परंतु बायकोला व पुढं वाढणाऱ्या मुलालेकरांच्या पसाऱ्याला पोसण्याइतका हा धंदा कमाईचा नाहीं, ही गोष्ट मनाला कशी बोचून राहिली आहे ! जेथें आहे या माणसांचीच उपासमार व्हायची पाळी, तिथें मुद्दाम लग्न करून मनुष्य वाढवण्यांत कोणता मतलब ?"

आणि अशाच खिन्न मनानें त्याचे दिवस चालले होते.

एक दिवस सकाळचा जवळ एका गावीं जत्रा होती तिला जाण्याच्या तो गडबडींत होता. कातड्याचीं बऱ्याच प्रकारचीं पायतणें त्यानें बरोबर नेण्यासाठीं बाधून घेतलीं होतीं. याच वेळीं त्याला बाहेरून त्याच्या नावाची हाक ऐकूं आल्यामुळें तो दाराशीं आला.

" कोण ? कचोपंत ? "

कचोपंत आपल्या दारापर्यंत आलेले पाहून रंगदासाला फार आश्चर्य वाटलें. आजपर्यंत जोडे घेण्याकरिता अगर केव्हां केव्हा मोट शिवण्याकरितां बाजारच्या दिवशीं क्वचित् त्याचा व रंगदासाचा संबंध येत असे. लहानपणापासून कचोपंत किंवा त्यांचा मुलगा चंद्रराव यापैकीं कोणाशींही त्याचें धंद्यापलीकडे फारसें बोलणेंचालणें कधीं झालें नव्हतें.

" होय, रंगदास. मी तुझ्या भावाला बोलावण्यासाठीं आलों आहें. आमच्याकडे आलेल्या बड्या पाहुण्याना तलाव पाहण्यासाठीं जायचं आहे. बरोबर वाटाड्या हवा. गांवचीं सगळीं मराठ्याचीं पोरं जत्रेला गेलीं आहेत. मीही जत्रेला जाईन म्हणतों. चामारवाड्यात कोणी आमच्या जत्रेला येत नाहीं, म्हणून तुमच्याकडे आलों. "

" पण दोघेहि घरांत नाहींत. एक शेळीला चारायला घेऊन गेला आहे व एक शेतावर गेला आहे. "

" मग तूं जातोस का ? नाहीं तर मलाच जायला पाहिजे. "

" पण मला माल घेऊन जत्रेला जायचं आहे. "

" अरे, पण तिथं तुझी कितीशी विक्री होणार ? पाहुण्यांच्या कामाला आलास, तर तिच्या दुप्पट बिदागी मिळेल."

" ठीक आहे. तुम्ही व्हा पुढं, मी आलोंच. " रंगदास किंचित् कालानें बोलला.

कचोपंताकडे जे पाहुणे आले, ते अनपेक्षितच. दुसऱ्या दिवशीं जत्रेला जायचे विचार कचोपंत मनांत घोळीत असतांना, कचोपंतांची चौकशी करीत संध्याकाळच्या वेळीं एक इसम आले. कचोपंतांचे एक लहानपणचे स्नेही हैद्राबादेला होते. पाहुण्यांनीं त्यांचीच चिठी बरोबर आणली होती. आलेल्या गृहस्थांच्या पोषाखावरून, हमालाच्या हातांत जी ऐटबाज बॅग

होती तीवरून, प्रथमदर्शनींच पाहुण्यांच्या श्रीमंतपणाविषयीं कचोपंतांनीं केलेला तर्क त्यांच्या मित्राच्या चिठीनें अक्षरशः खरा ठरला.

मार्तंडराव हे हैद्राबादच्या जवळच असलेल्या एका सोन्याच्या खाणीची मालक अशी जी एक इंग्लिश कंपनी होती, तिच्या पदरीं असलेले एक बडे इंजीनियर होते. त्यांना प्रवासाची हौस होती व कचोपंतांच्या स्नेह्यांशीं सहज झालेल्या बोलाचालीवरून तलाव पाहण्याची संधि साधण्याची शक्यता त्यांना दिसली. आणि त्याप्रमाणें मुद्दाम रजा काढून ते आले होते.

मनमिळाऊपणा हा एक मार्तंडरावांचा स्वभावविशेष होता. समाजाच्या कोठल्याही थरात ते सहज मिसळत.

अर्थात् कचोपंतांना लौकरच त्यांनीं आपलेंसें करून टाकलें. पाचशें रुपये दरमहा मिळवणाऱ्या पगारदाराशीं शेतीवर जेमतेम गुजराण करणाऱ्या आपल्यासारख्यानें कसें वागावें ही अडचण कचोपंतांना मुळींच जाणवली नाहीं.

मार्तंडरावानीं त्यांच्या कुटुंबाची हकीकत विचारली, तेव्हां कचोपंत म्हणाले, " सध्यां प्रपंचाचा बिनीचा आधार म्हणजे माझा मुलगा चंद्रराव. यंदा तो बी. ए. ला बसणार आहे. पोटाला चिमटा घेऊन त्याला शिकवला. मी शेतीवर जगणारा मनुष्य. वास्तविक ऐपतीची लांबीरुंदी न बघतां त्याला महिन्याच्या महिन्याला पैसे पाठवतों आहें. बी. ए. झाल्यावर कुठं नोकरी लागली म्हणजे खर्च झालेल्या पैशाचीं पारणीं फिटतील."

" अहो, पण नोकरी लागेल तेव्हां ना ? " मार्तंडराव बोलले. " जिकडे तिकडे कपात चालू आहे. बी. ए. झालेले सुशिक्षित हमाली करूं लागले आहेत. एक सुशिक्षित म्हणे चांभार...! "

" शिक्षणाची निव्वळ विटंबना आहे ही ! " कचोपंत रागानें म्हणाले. " हमालीसारखे हलके धंदे शूद्रांनीं करावेत. ज्यांची सावली देखील आपल्याला वर्ज असल्यांचे उद्योग आपण करायचे ? पोरं एक चळलीं आहेत; पण त्यांचे आई-बाप कसे त्यांना वाटेल तसे वागूं देतात ? अचंब्याची गोष्ट आहे मोठी ! ! "

मार्तंडरावांना कांहीं बोलावेंसें वाटलें. कचोपंतांचा एकंदर कल पाहतां आपलें सांगणें त्यांना रुचणार नाहीं, हें समजून त्या विषयापुरता त्यांनीं आपल्या जिभेला लगाम घातला व विषय बदलून ते म्हणाले,

" कचोपंत, उद्यां आपल्याला एक वाटाड्या पाहा बरं का ! तलाव दोन तीन मैल आहे, तर चालतच जाईन म्हणतों. "

दुसऱ्या दिवशीं प्रश्नपुराजवळच्या गावीं जत्रा असल्यामुळें कचोपतांना वाटाड्या मिळण्याबाबत थोडी चिंता पडली होती; पण ती अखेरी दूर झाली.

× × ×

रंगदासाचा उमदा स्वभाव मार्तंडरावाना फार आवडला. उलट रंग-दासालाही मार्तंडरावाची आपल्याशीं असलेली मनमोकळी वागणूक पाहून आपला अत्यंत गौरव झाला असें वाटलें. त्यानें आपल्या हृदयात कोणतीं कुसळें सलत आहेत तीं मार्तंडरावांना अदबीनें पण आडपडदा न ठेवतां सांगितलीं.

तलाव व त्याभोंवतालची सृष्टिशोभा रसिक मनानें अवलोकताना मार्तंडराव आपल्या वाटाड्याचीही उपेक्षा करीत नव्हते. ते रंगदासाला म्हणाले—

" एकंदरींत तूं मोठा महत्त्वाकांक्षी मनुष्य दिसतोस. तुझ्यासारख्याना आजकाल शहरात भरपूर वाव आहे. आमच्या हैद्राबादेंत जर एखादं दुकान उघडून धंदा चालवलास व कौशल्य दाखवलंस तर मोठ्या नावा-रूपाला पोंचशील. "

आणि रंगदास परत येताना मार्तंडरावांचे हेच विचार मनांत उलथे-पालथे करीत होता. प्रश्नपूरला आल्यावर बूट फाटण्याच्या बेताला आला म्हणून असो, अथवा रंगदासाला मदत करण्याच्या बुद्धीनें असो, मार्तंड-रावांनीं त्याला एक बुटांचा जोड ताबडतोब करण्यास सांगितला व नमु-न्याला आपल्याजवळचे बूटहि दिले.

रंगदासानें फक्कड काम केलेलें पाहून मार्तंडराव खूप झाले आणि त्याच्या हातावर पाच रुपयांची एक नोट ठेवून म्हणाले, " रंगदास, येच

तुं आमच्या हैद्राबादेला. खरोखरच मोठा कुशल कलावंत आहेस. तुझ्या व्यापारावर तुझं एकट्याचं नुसतं पोटच तूं भरशील असं नव्हे, तर तूं मोठा श्रीमंतहि होशील. ”

दुपारच्या वेळीं मार्तंडराव जायला निघाले, तेव्हा कचोपंत परत आलेले होते. त्यांनीं ज्या वेळीं मार्तंडरावाची रंगदासाबद्दलची स्तुति ऐकली, तशी ते बोलले,

“ उ ! किती झालं तरी चाभार तो चांभार व ब्राह्मण तो ब्राह्मण. अंगणाबाहेर उभं करण्याची रंगदासाची योग्यता; तो काम कसोटीनं करतो यात वाद नाहीं. पण तुम्हीहि त्याला पांच रुपये दिलेतच ना ! मग गरज काय त्याला एवढ्या इंद्रपदावर चढवण्याची ! मी म्हणतों त्यानं तुम्हाला फसवलं, लुबाडलं. मी त्यापैकीं चार रुपये तुम्हाला परत देववतों.”

मार्तंडरावानीं कचोपंताना तसें कांहीं करूं दिलें नाहीं. त्याच्या अंतः-करणातून कचोपंताना काहीं सागायचें होतें; पण पहिल्याप्रमाणें या वेळींहि मोठ्या मिनतवारीनें त्यानीं आपली ऊर्मि आवरली.

मार्तंडराव गेल्यावर थोड्याच दिवसात रंगदासानें त्याच्याहून दोन वर्षांनीं लहान असलेल्या पाठच्या भावावर प्रपंचाची मदार टाकून प्रश्नपूर सोडलें.

चंद्रराव बी. ए. होऊन सहा महिने झाले. अनेक कचेऱ्यात त्यानें सफरी केल्या; पण त्यापैकीं एकहि फलद्रूप झाली नाहीं. प्रत्येक ठिकाणाहून निराश मनाने परत आलेला चंद्रराव, कचोपंताचे ‘ उगीच शिकण्यात पैशाचा खराबा केला, ’ ‘ कार्ट्यांचं नशीबच धड नाहीं ’ असले उद्गार ऐकले की अधिकच निराश होई.

एक दिवस कचोपंताना मार्तंडरावाची—अर्धा एक दिवस आपल्या घरीं राहून गेलेल्या पाहुण्याची— अचानक आठवण झाली. त्याच्या वशिल्यानें कोठें नोकरी लागली तर पाहावी म्हणून मार्तंडरावाकडे चंद्ररावाला एका पत्रानिशीं त्यांनीं रवाना केले.

चंद्ररावाला उतरण्यासाठीं कचोपंतांनीं आपल्या मित्राचा पत्ता दिला होता.

चंद्ररावाला जाऊन चार महिने झाले, पण त्याचें कांहींच पत्र आलें

नाहीं. कचोपंताना व त्याच्या घरांतील मंडळींना वाटलें, मुलगा काम-धंद्याला लागला, त्यास कागदाची चकतीहि लिहायला फुरसत नाहीं. कचोपंतानीं आपल्या स्नेह्याला एक-दोन पत्रें टाकून पाहिलीं; पण त्यांचींहि उत्तरें आलीं नाहींत. कचोपंतांना स्वतः इतकें भाडें खर्च करून हैद्राबादेस जाणे वाजवी वाटलें नाहीं.

परंतु ही त्याची पत्राविषयींची आवश्यकता फार ताणली गेली नाहीं. एक दिवस मनीं-मानसीं नसता हैद्राबादेहून नुकताच आलेला रंगदासाचा धाकटा भाऊ कचोपंताच्याकडे आला व त्याना उत्सुकतेनें कांहीं सांगूं लागला. पण त्याच्या पहिल्याच वाक्यानें कचोपंत कोमेजून गेले व प्रत्येक शब्दागणिक त्याची अस्वस्थता वाढतच होती.

× × ×

कचोपंत व त्याची बायको याना क्षणापूर्वीच कळलेल्या बातमीनें विजेचा धक्का बसला.

कचोपंत हैद्राबादेस जाण्याच्या तयारीला बावरल्या चित्ताने लागले..

सुदैवाने म्हणा किंवा दुर्दैवानें म्हणा, कचोपंताना कळलेला मजकूर खरा ठरला. चंद्ररावाने चाभाराचा पेशा पत्करला होता व तसें करताना कचोपंताच्या जुन्या मित्राचा सल्ला धुडकावून लावला आणि रंगदासाच्या हाताखालीं दोन महिने शिकून त्यानें आता बूट, वहाणा इत्यादि कातडी मालाचें स्वतंत्र दुकान थाटलें होते.

कचोपंताच्या स्नेह्याला पहिल्यानें वाटलें, बापाच्या संमतीनेंच चंद्र-रावानें या गोष्टी केल्या. शिवाय त्याची मसलत चंद्ररावानें उधळून लावल्यामुळें तो रागातच होता व म्हणून त्यानें कचोपंताच्या दोन्ही पत्राना उत्तरे देणें हेतुपूर्वक टाळलें. चंद्ररावाला आपण करतों हे कचोपंतांना आवडणार नाहीं अशी खात्री असल्यामुळें तोही मुखस्तंभच राहिला.

× × ×

चाभाराच्या धंद्यापासून चंद्ररावाला परावृत्त करण्याचे सर्व इलाज व्यर्थ ठरल्यावर कचोपंत मार्तंडरावाना भेटण्यास गेले व घडलेली हकीकत त्यांना सांगूं लागले.

" मला माहीत आहे सारं कांहीं, " मार्तंडराव मध्येंच त्यांना थांबवून म्हणाले, " चंद्रराव माझ्याकडे तुमची चिठी घेऊन आला होता. पण मी तरी काय करूं ? आमच्या कंपनींत सध्यां असलेल्या नोकरांचीच नोकरी टिकविता टिकवितां त्रेधातिरपिट उडत आहे, तेथें नवख्यांना कोण पुसतो ? चंद्रराव आधीं रंगदासाला भेटला असावा, कारण माझा नकार दिसताच चांभाराचं दुकान घालण्याची त्यानं आपली तयारी मजजवळ दर्शविली. मी कांहींच बोललों नाहीं त्या वेळीं. पण एकंदरींत झालं हें ठीकच झालं असं मला वाटतं. दिवसंदिवस पोटापाण्याचा प्रश्न मोठा बिकट होत चालला आहे. लाज वगैरे सोडून ज्यानं त्यानं आपली भाकरी मिळविण्याचा सुचेल तो मार्ग शोधून काढावा. विशेषतः कलेवर भर द्यावा. आजकाल रंगदासासारख्या कलावंतांची— मग ते हलके असोत किंवा मोठे असोत— अधिक जरूर आहे आपल्याला. कसबामुळं पैशाची कुचंबणा त्याना केव्हां भासायची नाहीं. स्वतंत्र रीतीनं ते आपला मार्ग काढतात. नोकरीचं जिणं परावलंबी आणि परधार्जिणी, म्हणूनच रंगदासासारख्यांना मी मान देतों. "

कचोपंत दिङ्मूढ झाले होते. त्यांना काय उत्तर द्यावें हेंच सुचेना !

# उन्मत्त हत्ती ४

आज शनिवार—

कचेरी सुटतांना रविवारच्या सुटीची भावना जागी असल्यामुळें घरीं जाणारा प्रत्येकजण विशेष खुषींत होता.

बंडेरावच काय ते याला अपवाद होते. अगोदरच वय झालेलें न् त्यांत मनामध्यें उलटसुलट विचारांचें काहूर !

ते सावकाश सायकल स्टॅंडकडे आले.

सायकलवरूनही बंडेराव हळूहळूच जात होते. तरी पण गर्दीप्रमाणें पायगाडीची गति कमीअधिक मंद करण्याकडे त्यांची दृष्टि नव्हती. वाटे-मध्यें 'काय बंडेराव' अशी जोरांत एका शेजारींच काम करणाऱ्या कारकुनानें मारलेली हाक त्याना ऐकू गेली नाहीं. त्यांचें भानच नष्ट झालें होतें.

अजूबाजूला नीट निरखून सायकल हाकण्याच्या मनःस्थितींत ते नसायला कारण—

वरिष्ठ अधिकारी कोंडोपंत— तरुणपणांत ज्यांच्यावर बंडेरावांनीं उपकार केले ते !

बंडेरावांच्या कपाळावरील मधली शीर फुगलेली होती. उतारवयांतील

त्याचा चेहेरा रागीट दिसत होता. एरवीं सिगारेट पेटवून तिचे झुरके घेतां घेता ते सायकलची पायटी मारीत.

बंडेरावाचा नेहमींचा सर्वच कार्यक्रम उलटापालटा झालेला होता.

कोंडोपंताशीं घडलेल्या बोलाचालीनें त्याचें डोकें भणाणलें होते. कोंडोपंताचीं मुक्ताफळें बंडेरावाच्या कानात तापलेल्या सळया खुपसाव्यात तशीं घुसलेलीं होतीं. त्याचें अंतर्याम अगदीं भडकून गेलें होतें.

× × ×

लहानपणापासून बंडेराव तेजस्वी स्वभावाचे होते. खानदेशात भडगावच्या आसपास त्याच्या वडिलानीं मुलासाठीं फार विस्तृत शेती कमवून टेवली होती. त्याचे वडील फौजदार होते. ते जीभ-शिंदळ होते. पाहिजे तसा शिवराळपणा करण्यास त्याची जिव्हा सदासर्वदा सिद्ध असे. संवयीमुळे हवें त्याला ते हव्या त्या शब्दात छेडीत असत. गुन्हेगाराना उद्देशून ज्या शिव्या ते कामावर असताना वापरीत, त्याचाच वर्षाव घरीं करण्यात त्याना कसलाच धरबंद वाटत नव्हता !

पेन्शन घेऊन फौजदार भडगावला आले. दुसऱ्या का तिसऱ्याच दिवशीं बंडेरावाच्या बायकोला ऐकली कीं नाकातले केंस जळतील अशी अत्यंत घाणेरडी शिवी फौजदारानीं हासडली. नगद नाण्याकरिता, शेतीचा पेशा पत्करलेलीं मुलें, बापावर विसंबून असल्यानें अपमानकारक बोलणी सगळ्यानीं निमूट सोसावीं अशी परिस्थिति होती. मात्र बंडेरावाना ही शिवीगाळ खपली नाहीं. म्हातारा पण हट्टी पेटला— कडाक्याचें भांडण जुंपले आणि अखेर बंडेराव आपल्या कुटुंबानिशीं घराबाहेर पडले.

हरप्रकारच्या नोकऱ्या करून त्यानीं मॅट्रिकच्या पुढचें एल्‌एल्‌.बी. पर्यंतचें शिक्षण हस्तगत केलें. वकिलीची सनद घेऊन वऱ्हाडात त्यांनीं व्यवसायाला प्रारंभ केला.

लोकमान्य टिळकाच्या चळवळीचा ऐन भर असण्याचा तो काळ होता. वऱ्हाडात वकिलीचा धंदा किंवा वैद्यकीय व्यवसाय म्हणजे हमखास सुवर्णकण सापडणारी खाण होती.

पहिलें महायुद्ध त्या वेळीं चालू होतें–

—कोणी तरुण गृहस्थ एक दिवस बंडेरावाकडे येऊन म्हणाला,

" ...टिळकांच्या पक्षाचे पुण्याचे डॉक्टर वेंचून काढून त्याना सक्तीनं सैन्यात दाखल करून घेण्यात येत आहे...माझ्या वडिलाना असंच पलटणीबरोबर परदेशीं जावं लागलं... डॉक्टरीच्या परीक्षा न झेपल्यानं मी वकील झालों...पुण्यामध्यें वकिली करण्याची भीति वाटते...तुम्ही राष्ट्रीय वृत्तीचे आहा...मला मार्ग दाखवा... "

बंडेरावानीं कोडोपंताना मोठ्या मानमरातबानें ठेवून घेतलें. कांहीं महिने धंद्याची योग्य दिशा कोडोपंताना त्यानीं दाखवली– आणि वकिली सुरू करण्यासाठीं वऱ्हाडमधील संपन्न अशा भागाचीं नावे सुचविलीं.

परंतु कोडोपंतानीं डॉक्टरी जशी अर्धवट सोडली, तशीच वकील होऊन देखील वकिली टाकली. त्याची कुवत कमी पडली. मग बंडेरावानीं मुंबई हपिसात कारकुनाची सरीम भरती चालू होती तिकडे एकाच्या ओळखीने कोंडोपंताची वर्णी लावली.

बंडेरावानीं वकिलींत अतोनात पैसा मिळवला. नातेवाईक साहजिकच त्याच्याकडे वरचेवर येत. मडगावच्या वडिलार्जित मालमत्तेची त्यानीं आशा धरली नाहीं. मडगावातील कोणाही भाऊबंदाचा, ते वरीं उतरले असता बंडेरावानों अव्हेर केला नाहीं. तेथे पाहुण्याची सदैव ये-जा असे. काही काही पाहुणे दोन अडीच महिने बंडेरावाकडे रहात, परंतु ' केव्हा जाणार ? ' ' काम अवघड आहे ! अजून नाहीं झालं ? ' ' किती दिवस मुक्काम आहे आणखी ? ' असले प्रश्न विचारून ओझरता देखील पाहुण्याच्या रहाण्याविषयीं त्यानीं कंटाळा दाखवला नाहीं. रोजच्या उद्योगाच्या अवाढव्य व्यापातही बंडेराव अतिथिअभ्यागताची आस्थेनें पूसतपास करण्याला चुकत नसत. पाहुण्याचा न् घरमालकाचा जेवणाचा बेत वेगळा असें कधींच नसे. तेथ कुठलाच पंक्तिभेद केला जात नव्हता.

अतिथींसंबंधीं अनादर वऱ्हाडमध्ये कुठल्याही गावात कुणाच्याही गावीं नसतो. बंडेरावाशीं कामकाजाचा संबंध येणारे शेतकरी तर सदाच बंडेरावाकडचीं माणसें पान खायला शेतावर घेऊन जात. दोन दोन दिवस बंडेरावाची बायको मुलें कोणी पाहुणे असले तर ते देखील जोडीला शेत्याच्या

खेडेगावीं राहात ! याखेरीज त्यांची सुटकाच नसे, एवढा आग्रह होई. बैलगाडींतून माणसें परत पाठवतांना वऱ्हाडचा पाटील अगर शेतकरी अत्यंत लीनतेनें म्हणे,

" या वक्ता वकीलसाहेबाच्या मंडळीची आबळच झाली. आरवीन कवा तरी या...! "

वेगवेगळ्या खेड्यातून अशीं वरचेवर बोलावणीं येत.

केवढी आपुलकी— घरोब्यानें वागण्याची पद्धत— वऱ्हाडमध्यें आजतागायत दिसून येते. बंडेरावाचा स्वभाव असाच बनून गेला होता. वऱ्हाडची परंपरा ते चालवीत होते.

—कोंडोपंताच्या नोकऱ्या क्वेटा, लाहोर, दिल्ली, मीरत अशा निरनिराळ्या ठिकाणीं झाल्या. त्याचा मुलगा मधुसूदन याला अभ्यासासाठीं एकजागीं ठेवणें अगत्याचें होतें. बंडेरावानीं आपलेपणानें ही जबाबदारी अंगीकारिली.

मधुसूदन हुषार आहे याचें त्याना समाधान वाटलें. खुद्द त्याच्या मुलाचा शिक्षणाशीं छत्तीसाचा आकडा होता. हॉटेलात खायची त्याला पक्कीच चटक लागली होती. मधुसूदन आपल्या चिरंजीवापासून अलिप्त राहील अशी बंडेरावानीं खबरदारी राखली. त्याकरिता स्वतःच्या लेकाला त्यानीं त्याच्या आजोळीं पोहोंचता केला आणि आजोळच्याना तो कांहीं सुधारतो का काय तें पाहायला सांगितलें.

बंडेरावाची दुसरी मुलगी उत्तरा हिची मात्र अभ्यासांत निःसंशय प्रगति होती. मधुसूदनहून उत्तरा तीन वर्षांनीं लहान होती.

यावरूनच बंडेराव कोंडोपंताशीं एकदा काहीं काळ गांठ पडली असतांना म्हणाले,

" आमच्या उत्तरेला रूपांत तर सारेच वाखाणतात—परीक्षेच्या न् अंगच्या गुणातही ती वरचढ आहे. तुमच्या मधूचं नि हिचं पुढंमागं कार्य उरकूं."

कोंडोपंत हंसत हंसत पसंती दर्शवीत बोलले,

" बंडेराव, तुम्ही नामांकित वकील...मी यःकश्चित् कारकून...मधू बुद्धींत चलाखीचा तर मी हलाखीचा...पदवीधर बहुतेक शिरलेच नाहींत म्हणून माझा बडेजाव—खात्याची परीक्षा हा कसा पास झाला असं बरोबरीचे

लोक थट्टेनं विचारतात...तुम्हाला माहीतच आहे म्हणा आमच्या कर्तृत्वाचा प्रभाव..."

बंडेराव उद्‌गारले,

" मधू उत्तम आहे एवढंच मी पाहतो. द्रव्यानं निर्माण झालेल्या स्थितीचा मी विचारच करीत नाहीं ! "

—बंडेराव वृत्तीनें खरोखरच दिलदार होते.

एकदा वऱ्हाडच्या एका पाटलाला गुंतागुंतीच्या खटल्यातून बंडेरावानीं वाचवलें.

बंडेरावाना एक दिवस त्यानें 'पान खायला' बोलावलें. आपल्याकडे चहा घ्यायला आमंत्रण करतात, त्याच धर्तीचें वऱ्हाडात हें बोलावणें असतें. बंडेराव अशा वेळीं बहुधा एकटेच जात. तथापि या खेपेला त्यानीं मधुसूदनला बरोबर घेतलें.

पाटलाच्या घरीं बंडेराव गेले तेव्हा त्याच्या मुलाच्या पाच बोटात पाच सोन्याच्या आंगठ्या अन् मनगटात सोन्याचीं कडीं होतीं. ते अलंकार पाटलानें मधुसूदनला बंडेरावाचा मुलगाच समजून त्याच्या अंगावर चढवले.

बंडेरावानीं ती देणगी मधुसूदनचीच मानून कोंडोपंताकडे रवाना केली.

वकिलीच्या धंद्यात बंडेरावाच्या हाताशीं पैसा पुष्कळ येऊं लागताच त्यानीं स्वतःचे घर बाधले न् शेती घेण्यास सुरुवात केली. कपाशीचें एक एक वावर ही जणुं सोन्याची काब होती. द्रव्य दिसत चालले अन् बंडेराव जमीनखरेदींत जास्त जास्त रक्कम गुंतवूं लागले.

एकोणीसशें अठ्ठावीसात बंडेरावानीं कर्ज-वाम करून शेतींत पैसा पेरला. पुढल्या वर्षी पासष्ट हजाराची सहज कमाई होईल इतकी तयारी त्यानीं केली.

पण १९२९ साल हें १९२८ च्या मोसमापेक्षा एकदम निराळें ठरलें; कपाशीचा भाव भलताच घसरला. नंतर दर हंगामात कपाशीचा दर कमी कमीच होत चालला.

—आणि बंडेरावाना एकोणतीसमध्यें जेथें साठ हजारावर फायदा व्हायचा तेथे चाळीस हजार रुपयाचें कर्ज झालें.

मोठ्या धीराचीं माणसें विष खायला निघतील असा तो समय होता.

त्यालाही बंडेरावानीं टेक दिली. त्याचीं सत्तेचीं शेतें गेलीं. बंडेरावानीं घर गमावलें.

१९३० सालात बंडेराव बहुतेक गांधींच्या चळवळींत लक्ष घालूं लागल्यानें त्याची गावातील प्रतिष्ठा कशीबशी टिकली.

त्याची प्रॅक्टिस दिवसेंदिवस घटत होती. याच सुमारास 'वकिलानीं भाडणें लावून वऱ्हाडच्या पाटलाला रंक बनवला' असा जोरदार प्रचार सुरू झालेला होता. वऱ्हाडी शेतकरी म्हणत,

"सरकारनं आमचं वाखे माडलेत अन् त्यात हें वकीलबहादूर..."

काय असेल ते असो, बंडेरावाना उमरावतींत मानानें दिवस काढणें मुष्किलीचे झालें. त्यानीं तिथला सर्व कारभार आवरायचा निर्धार केला.

मधुसूदन अर्थातच कोंडोपंताकडे गेला. उत्तरेच्या अभ्यासाच्या सोयीबद्दल कोंडोपंत काहीं व्यवस्था करतील अशी बंडेरावाची अटकळ होती. पण वस्तुस्थिति जाणूनसवरूनही कोंडोपंतानीं हालचाल केली नाहीं.

बंडेराव उमरावती सोडतांना—

त्यानीं ज्याचे दावे जिंकून दिले ते आजूबाजूचे शेत्ये पूर्वीचा ऋणानुबंध विसरले नाहींत. आपापल्या घरीं स्वतःच्या मगदुराप्रमाणें स्वागताची साधनें ठेवून त्यानीं बंडेरावाना पाहुणचाराला बोलावून नेले.

प्रथम बंडेरावानीं भडगावास मुक्काम केला. मागें त्याच्याकडे येणारे भाऊबंद आता त्याच्या पाठीशीं उभे राहण्याचीं चिन्हे नव्हतीं. उलट वाटणीचें त्रागडें उपस्थित होऊं नये यासाठीं बंडेराव भडगाव सोडतात केव्हा याची उत्सुकतेनें ते वाट पहात होते.

एकंदर तालमाल पाहून बंडेराव तेथून अंमळनेरास गेले अन् वकिली करूं लागले.

त्याचा एकुलता एक मुलगा लौकरच वारला. बंडेरावाकडून पैसे जाणें बंद झाल्यावर तो जेवणापुरताच आजोळीं राहून हरिपाठाचे अभग,

गुलबकावली, सचित्र कहाण्या असलीं पुस्तकें यात्रायात्रात विकी. यातल्या मिळकतीवर तो हॉटेलच्या खाण्याचा खर्च भागवीत होता.

अशाच एका यात्रेंत कॉलरा होऊन चिरंजीव आटोपले.

कुळाचा अंधुक आशाकिरण मावळला. बंडेरावाची उदासीनता वाढली. हृदयात कायमचें नैराश्याचे साम्राज्य पसरले. ते अलीकडे म्हणत,

“ उत्तरेचं लग्न ठरल्यासारखंच आहे. ... तो सोहळा डोळाभर पाहायला जगायचं ... नुसतं पोट काय कुठंही भरीन. ... ”

वकिलींत जेमतेम त्याचा संसार भागत होता. उरलेंसुरलें देणं फिटत होतें. भरभराट अशी नव्हतीच. मागचे इतर वकिलाचें वळण वशिले तोडून अशील बंडेरावाकडे चुकून माकून येत; बंडेराव दावेही फारशा हुरुपानें लढवीत नसत.

अशा रीतीनें काळ चालला असता १९४२ च्या बंडात अंमळनेरचें कोर्ट जळले. आता पुढें काय करावें हा बंडेरावाना बिकट प्रश्न पडला.

कोंडोपंताकडे अगदीं निरुपायानें ते पुण्याला गेले.

अलीकडे आटता काळ असता आपणास एकदाही न भेटणाऱ्या कोंडोपंताचा बंडेरावाना रागच आला होता.

पण करणार काय !

उत्तरेच्या अन्तःकरणात मधुसूदनविषयीं पूर्वीच्या आयुष्यात वारंवार थट्टा केल्यानें जे भाव उमटले, फुलले ते पाकळून पडणें नूर्त कठीण होतें— उत्पन्न झालेले नाजुक बंध तुटणें आटोक्याबाहेरचें होतें.

कोंडोपंत पुण्याच्या लष्करी कचेरींत ऑफिसर असून बी. एस्सी. झालेला मधुसूदन तेथेंच होता. डिपार्टमेंटच्या परीक्षा पहिल्या झपाट्यालाच तो उतरल्याचें बंडेरावाना समजले.

उत्तराही मॅट्रिक झाली होती. कॉलेजात शिकण्याची तिला तीव्र इच्छा होती.

लेकीच्या लग्नाचा हेतु मनात धरूनच बंडेराव कोंडोपंताशीं सलोखा राखीत होते.

बंडेराव राहायला आल्यावर कोंडोपंत अतिशय तुरळक त्याच्याशीं

बोलत. घरगुती जीवनात अकृत्रिम तऱ्हेनें कोंडोपंताच्या सहवासात राह-ण्याचा बंडेरावाचा हा पहिलाच प्रसंग होता.

संगतीला राहून पंक्तीला जेवल्याशिवाय मनुष्य कसा आहे तें कळत नाहीं हेंच खरें.

कोंडोपंत हापूसचे आंबे आणीत न् अंगणात खाट टाकून नजीकच्या बिऱ्हाडातल्या मुलांदेखत खुशाल फोडी कापून खात. बंडेराव सिगरेट ओढतात हे ठाऊक असूनही कोंडोपंत एकटेच त्याच्यासमोर सिगरेट पीत बसत. ऑफिसमध्ये कुणीं स्नेहभावानें चहा दिला तर 'चहा काढला', 'चहा न् सिनेमाला मिळून दोन रुपयाला त्याला कापला', 'चहाला गटवला', 'चहा मारला' हे विविध वाक्प्रयोग मधुसूदनचे मित्र, नव्हे खुद्द कोंडोपंताच्या तोंडातून ऐकताना बंडेरावाच्या मस्तकाचा भडका उडत असे— बंडेरावाना वऱ्हाडमधल्या न् या पुण्याच्या आदरातिथ्यात जमीन-अस्मानाची तफावत आढळली.

उत्तरेच्या कार्यसिद्धीकडे नजर देऊनच तशा कोंडमाऱ्यात ते राहिले.

अशातही एक दिवस कोंडोपंतानीं आपण लौकर जावें म्हणून पत्नीला जी युक्ति सुचविली ती चुगलखोर स्वैंपाकिणीकडून कळल्यानें बंडेरावानीं 'धरायला डहाळी नाहीं नु बसायला सावली नाहीं' अशी अवस्था न व्हावी याकरिता स्वतंत्र उद्योग करण्याची खटपट आरंभली.

या बाबतींत कोंडोपंत बोलले,

"आमच्या ऑफिसात कारकून पाहिजे आहेत. तुम्ही नोकरी धरा. मद्राशाशीं माझं घष्टण आहे. माझ्या सेक्शनलाच तुम्हाला घेतों. राहायला जागा ओळखीनें देतों. अर्जासोबतच्या सर्टिफिकेटवर गॅझेटेड ऑफिसरची सही लागते. ती मी द्यायचा नाहीं, तुम्ही तीस सालच्या चळवळींत होता हें मला माहीत आहे."

बंडेरावाना उत्तरेचें कार्य होईपर्यंत कोंडोपंताच्या कलानें वागणें भाग होतें. त्यानीं सर्टिफिकेटावर एका जुन्या स्नेह्याची स्वाक्षरी चटकन् मिळविली.

कोंडोपंताच्या अधिकाराखालीं ते फायली इकडून तिकडे नेऊं—आणूं लागले.

बंडेरावांच्या बरोबरीचे किती तरी जण तेथें ऑफिसरच्या जागा भूषवीत होते.

हलकीसलकी कामें कोंडोपंत सांगत. लोकाना राबवून घेण्याची, बारक्या बाबतींत फायदा घेण्याची त्याची मनोरचना अनेकदा प्रकट झाली.

कोंडोपंताना सायकलवरून जातांना क्लिपा हव्या होत्या. बंडेरावानीं नुकत्याच खरेदी केलेल्या क्लिपा त्यानीं मागितल्या. त्या परत देण्याची गोष्ट नाहीं. पोस्टकार्ड असेच कधीं तरी पाहिजे होते. सायकल पंक्चर काढायला न्यायला गड्याला ते बंडेरावामार्फत फर्मावीत. पैसे अर्थातच बंडेराव भरीत !

बंडेरावाना शिसारी आली. पण उत्तरा—

कोंडोपंताच्या घरीं राहिल्यानें मधुसूदनशीं तिचीं हितगुजें झालीं. तिच्या अपेक्षा वाढल्या.

लग्नाच्या खर्चासाठीं रेशन ऑफिसात नोकरी करून ती पैसे साठवीत होती.

मधुसूदन कोंडोपंताच्या शब्दाबाहेर नव्हता; बापाच्या वैभवासकट त्याला उत्तरा मिळाली तर पाहिजे होती. बंडेरावाना ही विचारसरणी वावगी वाटली नाहीं. श्रीमंतींत उत्तरेचें कल्याणच होणार होतें. प्रेमासाठीं पारखे बनून व्यवहाराला पारखे बनायचें यात अंतिम हित मुळींच नव्हतें.

ज्याच्याकरिता बंडेरावाची तपश्चर्या चालू होती, जो विषय निघावा असें बंडेरावाच्या पुष्कळ दिवस मनात होतें, त्याची वाच्यता कोंडोपंताकडून अजिबात होईना ! मरतेशेवटीं एकदा काय तो सोक्षमोक्ष करण्याच्या हिरिरीनें बंडेराव त्या दिवशीं ऑफिसरच्या खोलींत गेले. ऑफिस सुटलें असल्यानें कारकून वर्ग बाहेर पडण्याच्या धादलींतच होता; संभाषणाचा बोभाटा होण्याचा संभव नव्हता.

बंडेरावानीं धूम्रपानात गढलेल्या कोंडोपंताना सरळ विचारलें,

" उत्तरा–मधूचं लग्न मागंच नक्की झालंय्...यंदा उरकायचं का ? "



कोंडोपंत बंडेरावाना ‘ बसा ’ असेंही न म्हणता भव्य हिरव्या कापडाच्या टेबलावरील रक्षापात्रात सिगारेटची राख झाडीत म्हणाले,

“ मिस्टर बंडेराव, तुम्हाला हें विचारवलं तरी कसं ? मुलाचं लग्न करताना पोझिशनचा विचार मला केलाच पाहिजे. मी गॅझेटेड ऑफिसर न् तुम्ही तीस वर्षांच्या पुढले म्हातारपणांत लागलेले कारकून. . . .परवा तुम्ही आजारी असल्यानं ऑफिसला आला नाहींत . . . दवाखान्यातून मला टेलिफोन ! एखाद्या बरोबरीच्या कारकुनाला फोन करायचा का मला ? मीं तुमची गय केली...”

बंडेरावाची मुद्रा पालटली. त्याचें रक्त उसळलें. ते म्हणाले,

“ ‘ सौजन्य तेथ सोयरीक ! ’ हा चरण तुम्हीं वाचला नसेलच. मला तुमच्या ज्ञानाचा परिचय आहे न् वागणुकीचाही ! तादुळातलं खडवण तसंच राखून पाहुण्याना भात घालायला, रेशनच्या आट्यांतले पोरकिडे न निवडता पोळया वाढायला तुम्ही कुटुंबाला सांगितलंत– पाहुणे जावे म्हणून. ही तुमची दानत. बिचारी भाग्यलक्ष्मी भोळी. कुणाच्याही गळ्यात ती माळ घालते. या युद्धात खूप शंख अडणीवर चढले ! कोंडोपंत, वऱ्हाडात साध वकिलीचें बस्तान तुम्हाला बसवतां आलं नाहीं. पुण्यात प्रॅक्टिस चालेना. वऱ्हाडात चंगळ होईल म्हणून बाप सैन्यात गेल्याची खोटी सबब काढून तुम्ही माझ्याकडे आल्याचं ऐकलं...”

“ Get out you idiot !” कोंडोपंत एकदम ओरडले. त्यानीं घंटा वाजवली.

चवताळलेल्या बंडेरावाना शिपायानें बाहेर खेचलें—

“ बंडेराव, तुम्ही कुणाशीं बोलताहात हें ध्यानात घ्या...एका लेखणीच्या फटकाऱ्यानं मी तुम्हाला अन्नाला मोताद करीन...हॅं हॅं. मधूला जावई करतोय् बेटा... ! ”

हेच...हेच... कोंडोपंतांचे शब्द बंडेरावाच्या अंतःकरणात ठणका उत्पन्न करीत होते.

“ पित्याच्या परिस्थितीमुळं आपलं मनाजोगतं लग्न होत नाहीं याचें उत्तरेस काय वाटेल ? ”

त्याना कल्पनाच करवेना.

ससून हॉस्पिटलजवळील चौकामध्यें—

बाजूच्या रस्त्यानें लष्करी लॉरी भरधाव येत होती. बंडेरावांच्या हे उशीरा ध्यानीं आलें. पण त्याचें धोतर चेनमध्यें अडकलें; क्लिपा नव्हत्या. त्यानीं उजव्या पायाला बांधलेला रुमाल सैल होऊन पावला-पर्यंत गळत गेलेला होता.

—मोटारच्या मधोमध बंडेराव सायकलसुद्धा सांपडले !

—अत्यस्वस्थ स्थितींत त्याना जवळच ससूनमध्यें नेण्यात आलें.

बंडेराव त्वेषयुक्त स्वरात पुटपुटत होते,

"पैशानं पिसाळलेल्या, संपत्तीन उन्मत्त झालेल्या हत्तीनं—कोंडोपंतानं—मला पायाखालीं तुडवलं—द्रव्यानं माणुसकीचा बळी घेतला !"

—असली बडबड चालू असताच बंडेरावाचें प्राणोत्क्रमण झालें.

× × ×

त्या दिवशीं संध्याकाळीं लष्करी हिशेबाच्या कचेरींतील अधिकाऱ्याची खाजगी बैठक ऐन रंगात आली होती. रेस खेळण्यास मुंबईला गेलेला एखाद दुसरा वगळता बहुतेक मित्रगण हजर होते. पत्ते नव्हते—फक्त हास्यविनोदच चालला होता. आजच्या गप्पाष्टकाचे कोंडोपंत हे पुढारी होते. एका म्हाताऱ्या हंगामी कारकुनाच्या अपघाती मृत्यूची खबर शक्य तेवढ्या खुसखुशीतपणें वर्णन करण्यात ते गर्क झाले होते. जमलेले लोक कोंडोपंताची अधूनमधून तारीफ गात नवी बातमी ऐकत होते.

सरतेशेवटीं कोंडोपंत म्हणाले,

"...त्याची बायको न् मुलगी दुपारीं माझ्याकडे आल्या न् म्हणाल्या—आम्ही बायका माणसं, अंत्यविधीला या. मीं झटकन् पांच रुपयाची नोट काढून दिली. मधू निघत होता, त्याला थांबवून धरला. अहो, ससूनमध्यें माझ्याविरुद्धच बरळत होता. जणूं काय मींच मारला त्याला लष्करी मोटरखालीं ! तरी बरं, दहा दिवस घरीं ठेवून घेतला, अगत्यानं वागवलं, नोकरी लावून दिली; त्याला मलता तोरा ! पण

संभाळून घेतला न् अखेरी पांच रुपये दिले. करणार काय ? माणूसकी स्वस्थच बसूं देत नाहीं हो ! ”

सोमवारीं या ताज्या ‘ बंडेराव प्रकरणा ’च्या निमित्तानें कोंडोपंतांनीं ऑफिसमधील बऱ्या मद्रासी धेंडांत आपल्या दातृत्वाचें न् दातांचें भरपूर प्रदर्शन माडीत महाराष्ट्रीयांवर मद्राशाना अ'वडणारा नालायकीचा शेरा पुन्हा मारला व लांगूलचालनानें लाभलेल्या आणि खूप शर्थीनें राखलेल्या स्वतःच्या अधिकारपदाचें सार्थक केलें.

---

# गिधाडाची झडप : : ५

" बाकी पिलूकाका, तुमचं डाळिंबगाव इतकं बदललं असेल अशी मला कल्पना नव्हती. "

" तुमच्या शहरच्या वस्त्या वाढताहेत ... तिथं दुसरीं कुटलीं माणसं येणार...आमच्या खेड्यातलींच..."

" पण पूर्वी आलों होतों," मीं पिलूकाकाना म्हटलं, " तेव्हा गाव गजबजलेलं होतं..."

" खरं आहे," पिलूकाका बोलले, " केव्हा लहान वयांत तूं आलास... त्याला वीसपंचवीस वर्षं सहज लोटलीं असतील ... बाजारपेटेंत त्या वेळीं शेकड्यांच्या उलाढाली होत...आसपासचीं माणसं येत..."

" अन् तिथं आज मीं फक्त एकच मारवाड्याचं दुकान पाहिलं... कापडचोपड तोच विकतो वाटतं...तुमच्या बाजूला घराला घरं लागलेलीं... प्रत्येकाच्या घरापुढं सडा-सारवण रांगोळया .. अन् आज डुकरं हिंडताहेत, मरतुकडीं कुत्रीं भुंकताहेत ओसाड जागातून..."

पिलूकाका भाऊबंदाच्या खटल्या खोकल्यांत अगदीं प्रथमपासून अडकलेले...वडलांपासूनचे त्याचे तंटे अजूनहि मिटले नव्हते. वकिलाच्या सल्लामसलतीसाठीं शहरात ते अधूनमधून येत... त्याचा आमचा फार

जुना लोभ......मला नेहमीं ते गांवीं चलण्याचा आग्रह करीत. ते म्हणत,

" अरे, तिकडचं हवापाणी बघ जरा. मागं बापाबरोबर आला होतास— त्याला युग होऊन गेलीं तरी तूं येण्याचा योग आणीत नाहीस."

—मध्यन्तरीं अनायसें दहा दिवसांची रजा मला मिळाली न् मी डाळिंबगावाला गेलों.

मोटारींतून उतरून घ्यायला आलेल्या पिलूकाकानीं नि मीं डाळिंब-गावची वेस ओलांडली— मी आजूबाजूला पाहातच राहिलों— तें खेडे मागच्यापेक्षा वेगळ्या प्रकारचें मला दिसत होतें.

जेवणखाण उरकल्यानंतर दुपारीं निवान्तपणें आम्ही पडवींत गप्पा मारीत होतों. बोलता बोलता माझ्या मनांत डांचत असलेला विषय मीं काढला.

पिलूकाका एकंदर खुलासा करण्याच्या उद्देशानें म्हणाले,

" मला इकडचं तिकडं पाहायला जमत नाहीं...भाऊबंदाच्या भांडणात... कायद्याच्या जबड्यात माझी मान अडकली आहे... त्या अण्णा जहागिरदाराच्या कच्छपीं मी सदा असायचा ... कोर्टाच्या तारखात मी गुंतलेलों न् अण्णांनीं विरुद्ध पक्षाला मदत करूं नये यासाठीं त्याना मी संभाळून घेत होतों ... गावकरी देशोधडीला लागत असलेले माझ्या डोळ्यानीं मी बघत होतों... व्यवहारांत पुष्कळदां दिशा कळत असूनही तिकडे वळता येत नाहीं... आमच्यापाशीं पुरेशी शक्ति नाहीं तेव्हा सहनशक्ति कसोटीला लावणं भाग पडतं... डाळिंब-गावातल्या मुख्य धंद्याचंहि कसं वाटोळं झालं ही एक स्वतंत्र हकिगत आहे...तुला कळेलच माझ्याकडून... मला सर्वांत हळहळ वाटते आमच्या गावच्या अमृता तेल्याबद्दल..."

" काय झालं त्याचं ? तुमच्या तोंडून दोनतीनदा हें नाव ऐकलं मीं..." माझी आठवण ताजी होऊन मी एकदम उद्गारलों.

" कुणाला कधीं विसर पडावा असा तो इसम नाहीं— माझं अण्णा-कडे वारंवार जाणं येणं... मला सारं ठाऊक आहे... याच्या पुढल्या आळीपलीकडे तें बघ...तें उंच भिताड दिसतं आहे ना..." पिलूकाका

बोटानें दाखवीत म्हणाले, " तें त्याचं काहीं काळ राहण्याचं ठिकाण ... त्याचा घाणा या इकडच्या भागाला होता....तिथं मात्र हल्लीं राहतं घर असल्याचा मागमूसहि शिल्लक नाहीं...

अमृता तेली या गावात सगळ्याना माहीत ! त्याच्या घराण्यातील तेल्याचा धंदा पिढीजात होता. या डाळिंबगावातून रोज दोन तीन पिपं कर्डईचं व शेंगदाण्याचं तेल बाहेर रवाना होई. अमृता तेलीच तें पाठवी .. गावात दुसरे एक दोन तेल्याचे घाणे होते. पण अमृता तेल्या-इतकी भरभराट कुणाचीच नव्हती.

तस पाहिलं तर आमच्या डाळिंबगावात ह्या धंद्याबद्दल पिढीजात नाव कमावलेलं घराणं गणू तेल्याचं. त्याचे पूर्वजानीं तेलाच्या धंद्यावर बरीच मामलत केली. गणू तेल्यानं पार सगळं घालवलं. तो स्वतःच कर्ज-बाजारी बनला.

उलट अमृता तेल्याला त्याच्या बापानं बरंच देणं करून ठेवलं होतं. तें अमृतानं आपल्या कारकीर्दीत फेडून धंदा वाढीस लावला होता.

आणि अमृता तेल्याची जी थोडीफार भरभराट लोकाना दिसत होती तीस तो पूर्णपणं लायक होता असंच म्हटलं पाहिजे. तो विलक्षण उद्योगी होता. फुकट चकाट्या पिटण्याचा त्याला कंटाळा होता. सकाळीं आठ वाजल्यापासून तों रात्रीं आठ वाजेपर्यंत बारा तास उद्योग करावा, काय मीठभाकरी मिळेल ती त्यानं, त्याच्या बायकोन व दोन पोरांनीं आनंदात खावी अशी अमृताची कालक्रमणा चालली होती. कोणीहि गिऱ्हाईक आलं तर त्याला दोन शब्द गोड बोलून संतोप द्यावा व गिऱ्हा-ईक निघून गेलं कीं पुन्हा आपल्या कामाम लागावं असं तो करीत असे. चार रिकामटेकडीं माणसं जमवून गावच्या नसत्या उठाठेवी करणं त्याला आवडत नसे.

गावात तो अप्रिय असण्याचं कारणहि हेंच होत.

डाळिंबगावातील पूर्वीपासूनचे मानमान्यतेस चढलेलं घराणं म्हणजे अण्णा जहागिरदाराचं ! वाडवडिलापासूनची बसून खाण्याची संवय अण्णाच्याहि अंगीं पूर्णपण बाणली होती. स्वतःच्या बैठकीवर तंबाखू चोळीत बसायचं, खिडकीबाहेर कोणी ओळखीचा मनुष्य दिसला कीं

त्याला आत बोलावून त्याच्याशीं मनमुराद गप्पा मारायच्या, हाच त्यांचा निजून उठल्यापासून पुन्हा अंथरुणावर पडेपर्यंत उद्योग ! बहुतेक सगळ्या गावची त्याच्याकडे सारखी ये-जा असे. अण्णा गावातील एक गावगुंडच होते असं म्हटलं तरी चालेल. गावात ज्या बारा भानगडी उपस्थित होत त्याचं मूळ शोधूं गेलं असता अण्णानीं आपल्या बैठकीवरून दिलेली चिथावणी हें बहुधा असायचच.

अण्णाची जहागिरदारी म्हणजे 'बड्या घरचा पोकळ वासा' अशा-पैकीं होती. खेडेगावचे जहागिरदार इनामदार आपणास असेच्च आढळतात. बापजाद्यापासून घरात बसून खाण्याची लागलेली चटक, ध्येया-शिवाय जीवन हीं या जहागिरदार-इनामदाराचीं डबघाईला येण्याचीं कारणं होत. सर्व जन्म गांवातच गेल्यामुळं व गावातील हे प्रतिष्ठित समजले जात असल्यामुळं कित्येक लहानमोठ्या उलाढाली या इनामदार व जहागिर-दाराच्याच तंत्रानं चालतात.

अण्णा जहागिरदार या गोष्टीस मुळींच अपवाद नव्हते. तसं पाहिलं तर त्याना कर्ज आहे अशीहि गुणगुण गांवात पसरलेली होती. पण लहान-पणापासून उद्योगाचं अन् अण्णाचं हाडवैर होतं. आळस हा तर त्याचा लंगोटीयार मित्र. त्याची शक्ति कशात असेल तर त्याच्या तोंडात ! आपण जहागिरदार आहोंत, गावचे कुणीतरी दुढ्ढाचार्य आहोंत, ही कल्पना त्याचे अंगीं पुरीपुरी भिनली होती व त्याच दृष्टीनं त्याची साऱ्या गावाशीं वाग-णूक असे. त्याच्याजकळ जरी पैसा नव्हता तरी त्यानीं आपलं महत्त्व तोंडातील बडबडीनं पूर्णपणं कायम ठेवल होतं. त्याच्या तोंडातील उक्तीची प्रचीति लोकाना वारंवार आली होती. चहाड्या करणं, रावाचा रंक व रंकाचा राव बनवणं, वेळप्रसंगीं दोघामध्यें भाडणं लावून दोघाचंहि वाटोळं करणं म्हणजे अण्णा जहागिरदाराच्या हातचा मळ होता.

याचा अजब अनुभव लोकाना अनेकदा आला होता. त्यामुळं गावात लोक अण्णाना वचकून असत. ज्या गरिबाचीं घरं अण्णानीं आपल्या कर्तबगारीनं पाताळाला नेऊन भिडविलीं होतीं ते तळमळत म्हणत, 'ईश्वर अशा दुरात्म्याकडे डोळेझांक फार दिवस करणार नाहीं. सध्यां

अंबारींतून मिरवतो आहे बेटा—पण म्हणावं अंबारी केव्हातरी उलटी होईल...'

पण असली मापा अण्णाच्या तोंडावर वापरण्याची कुणाचीच छाती नव्हती. गरीब लोक आपले अण्णाना नमून असत.

आताशी अण्णाच्या बैठकींत अमृता तेल्याचं नाव रोज निघूं लागलं होतं. ' आज अमृतानं चार पिपं खोबऱ्याच तेल बाहेर रवाना केलं. ' ' आज करडईच्या पेंडेकरता या गावाशीं त्याचा करार झाला. जवळ जवळ सत्तर लोकानीं अमृताकडची पेंड घ्यावी असं ठरलं. ' ' अमृतानं कालच दोन नवीन बैल खरेदी केले. ' ' अलीकडे नेहमीपेक्षा त्याच्याकडे दोन तीन दाया कामाला जास्ती असतात बरं का. ' असं रोज अण्णा जहागिरदाराच्या बैठकींत उद्‌गार निघत. या बातम्या सर्वांत जलदीनं बहुतेक गणू तेली पुरवीत असे.

आपल्याबद्दल दर दिवशीं जहागिरदाराच्या घरीं कांहीं ना कांहीं तरी चर्चा होते ही गोष्ट अमृताचेही कानावर आली होती. पण त्याचा असल्या गोष्टींत लक्ष घालण्याचा स्वभावच नव्हता. तो म्हणे, ' जहागिरदार मोठे आहेत. आमचा तेल्याचा वर्ग म्हणजे यत्किंचित्. पण माझंहि नाव ते घेतात हा अण्णाचा केवढा मोठेपणा—'

अमृता तेल्याचा घरून तेलाच्या घाण्यावर जाण्याचा रस्ता अण्णा जहागिरदाराच्या दारावरूनच होता. अमृता रोजच्याप्रमाणं कामावर निघत असता अण्णानीं त्याला खिडकींतून हाक मारली. अमृताला आश्चर्य वाटलं. त्याचा व अण्णाचा लहानपणापासून विशेष संबंध कधींच आला नाहीं. अण्णाच्या घरात लागणारं तेल, जाळण्यासाठीं करडईचं भुसकट, शेतांत बैलाना लागणारी पेंड हे जिन्नस अण्णा गणूकडूनच घेत असत.

" काय अण्णासाहेब..." अमृतानें आत जाता जाता विचारलें.

" अरे उभा का ?...जरा बैस..."

" काम आहे का अण्णासाहेब ? नाहीं तर परत केव्हा तरी येईन मी." अमृता म्हणाला.

" गावात सगळ्यांना माझ्याकडे गप्पा मारायला सवड सांपडते न् तुलाच नाहीं ! गंगाजळींत माया किती साठवलीस ? "

" कसचं अण्णासाहेब ! दिवसभर राबतों, पदरचे बैल, गडी, बाया, घरची कारभारीण, पोरं सुखानं दोन घास खातात हाच आनंद..."

" हें बघ! ढोंग करूं नको. प्रामाणिकपणानं सरळ वृत्तीनं वागणं हीच तुझी गंगाजळी नाहीं. पैसे आहेत तुझ्यापाशीं. तूं राहतोस तें घर माझ्या मित्राचं आहे. त्याला तुला भाडं द्यायला पाहिजे—"

" त्यांचा पत्ता सांगा. नोकरीधंद्याला असतात वाटतं ते ! इथं भाडीं कुणीच देत नाहीं तरी रुपया आठ आणे मी पोचते करीन."

" माझ्यापाशीं दे."

" तसं नको. त्याचा लेख दाखवा. तुमच्याजवळ देईन. घर विकत नाहीं का देणार ते ? "

" पाहीन, पाहीन मी ! जा तूं. " अण्णा म्हणाले.

अण्णाचा स्वतः पैसे मिळवायचा डाव अशा रीतीनें हुकला.

आता अण्णानीं दूर गावीं राहणाऱ्या घरवाल्याला ' तेली जागेची खराबी करतो...बारा वर्षे झालीं कीं घर त्याच्या मालकीचें— वहिवाटीचा हक्क त्याचा— तेव्हा त्याला हाकला ' अशा सूचना देण्यास वारंवार सुरुवात केली.

सरतेशेवटीं त्या घरवाल्याचें अमृता तेल्याला जागा सोडून जाण्याबद्दल पत्र आलं.

अमृता तेली घर विकत घेत होता, पण ' वडिलार्जित जागा मालकाला विकायची नाहीं ' असें अण्णानींच परस्पर तेल्याला उत्तर दिलं.

अमृतानें घर सोडलं आणि तो तेलाचा घाणा होता तिथेच सोय करून राहूं लागला.

इतक्यानेंही थांबलें नाहीं. अमृताच्या शीलाविषयीं नाहीं नाहीं त्या कंड्या अण्णानीं उठवायला सुरुवात केली. अण्णा म्हणत—

" अमृताकडे सहा बायका आज कित्येक महिने कामाला आहेत... पैसा मिळतो आहे. चैन आहे अमृताची... "

अमृताच्या कानांवर हें जायचा अवकाश, त्यानें कामाला असणाऱ्या बाया बरोबर घेतल्या न् जहागिरदाराच्या बैठकींत तो तडक गेला. अण्णाना रोकठोक त्यानें या गावगप्पाचा जाब विचारला.

अन् अण्णा गुळमुळीत बोलायला लागल्याबरोबर—

अमृतानें त्याच्या काड्दिशीं थोबाडींत भडकावली. त्या बायकाहि संतापून अण्णाना खूप बोलल्या. विड्यानें अण्णाचें तोंड रंगलें होतें. आता त्याचीं गालफडेंहि आम्हा मित्रांदेखत रंगवलीं गेलीं. गणू तेली व पान खाणारी इतर मंडळी चूपचाप बसली होती.

यानंतर दोन महिन्यानीं—

रात्रीं बारा एकच्या सुमाराला अमृताच्या घाण्याच्या जागीं आगीचा डोंब उसळला. बैल तिथेंच होते—त्याच्याकरता वैरण होती ! विशेष म्हणजे तेल होतें...अन् त्यामुळें आग ताब्यात येणें शक्य नव्हतें.

सपाटून कष्ट करून गाढ निजलेल्या अमृताला आगीच्या झळींनेंच जाग आली. बायकामुळेंच तो वाचवूं शकला चौघातला एक बैल त्यानें कसाबसा बाहेर काढला. पण नंतर तें भाजलेलें जनावर तडफडून मेलेंच.

सगळ्याची राखरागोळी झाली.

अमृताच्या मनावर याचा फार परिणाम झाला. ‘ धंद्याबरोबर आपलाहि नाश व्हायला हवा होता ’ असें त्यानें हताशपणानें उद्गार काढले.

दुसऱ्याच दिवशीं अमृतानें डाळिंबगाव सोडलें. हल्लीं तो कुठे आहे कुणाला माहीत ! कुणी म्हणतात सोलापूरच्या गिरणींत कामाला आहे. कुणी सांगतात कुठेशी भुइमुगाच्या शेंगाच्या तेलाची गिरण आहे तिथें तो नोकर आहे.

—डाळिंबगावात पुन्हा तो आला नाहीं एवढं खरं.

जहागिरदाराचा वाडा कर्जानें पोखरलेलाच होता. बाजारपेठेंतला मारवाडी कर्जाऊ पैसे देत होता आणि अण्णाच्या गमजा चालल्या होत्या. अण्णाची मिळकत गहाण पडली. पैशाची कमतरता भासली तशी त्याचे स्नेहीसोबती त्याना सोडून जाऊं लागले. गणू तेल्याची न् अण्णाची खडाजंगी झडाली. तिथें मी होतों. अमृताचें घर पेटवण्याचा घाट अण्णाचाच हे त्या भाडाभांडींत उघड झालं.

“ हल्लीं अण्णा परागंदा आहेत. नातलगाच्या आश्रयानं शिळ्या न् अन्न खात आहेत. ”

सर्व हकीगत संपवून पिलूकाका म्हणाले,

" गावात दोनचार हातमाग होते ते अण्णामुळंच बंद झाले...हें असं होत आहे...आमचीं माणसं आम्हीच बाहेर घालवीत आहोंत..."

" आणि गावगाडा मोडीत आहोंत." मी उद्गारलों. " श्रीमंत बनणारे मारवाडी लोटी घेऊन गावात येतात न् आम्ही नरोटी घेऊन गांव सोडतों. हेव्यादाव्याखालीं अमृता ठार झाला. सद्गुणी माणसावर निष्कारण झडप घालणाऱ्या अण्णासारख्या गिधाडांनीं खेड्याना श्मशानाची कळा आणली आहे."

" बरोबर बोललास," पिलूकाका म्हणाले, " मारवाड्यानं त्याचं देणं फिटण्याइतकं जहागिरीचं उत्पन्न खाल्लं कीं अण्णा परत डाळिंबगांवांत येतील. गिधाडाच्या बिरड्या सुरू होतील. पण अमृता...गेला तो गेलाच ...माघारी यावंसं त्याला वाटणार तरी कसं ? "

---

# पंच : : : ६

गंगाधरच्या घरची गरिबीच. मॅट्रिकपर्यंत त्यास शिकणें शक्य झालें हेंच जास्ती— मग कॉलेजची कशाला बात—

—शाळा संपल्यावर त्यानें एक टाइपराइटिंगचा क्लास धरला.

रोज दोन तास प्रॅक्टिसला जायचें. संध्याकाळीं सात ते रात्रीं नऊ.

असाच तो एकदां टाइपराइटिंगच्या क्लासला निघाला होता.

वाटेंत त्याला कोणी टांगेवाला टांगा जोडीत असतांना आढळला.

" अरे हैबती ! आत्तां टांगा दामटतोस ? दिवसा घरींच होतास म्हणून रात्रपाळी कीं काय ? "

" तसं नव्हे गंगाधरराव. दिवसाचं गिऱ्हाइक भेटलं नाहीं. चौकांत जवळ जवळ बारा घंटे गाडी ताटकळत ठेवली— एक स्वारी नाहीं. मग काय करतां ! पोटाला खायला तर हवं ? पदरीं चार मुलंबाळं, रात्र जागून काढणं आलं, मिळतील आगगाडीच्या वेळेला कांहीं पॅसेंजर. "

गंगाधर पुढें सरकला.

—रात्रीं नऊ वाजतां गंगाधर बिऱ्हाडीं येण्यास निघाला टाइपराइटिंग संपवून.

—त्याला मार्गांत हैबतीचा टांगा आढळला.

टांग्यांत स्वाऱ्या होत्या. टांगा भरधाव चालला होता.

हैबतीस गिऱ्हाइक भेटल्याचें गंगाधरला समाधान वाटलें.

रात्रीं जेवणें आटोपल्यानंतर—

घोड्याच्या टापा ऐकूं आल्या. हैबतीचे ' ए याव्, ए याव् ' हे शब्द कानीं पडले.

हैबतीचा टांगा पुन्हां गिऱ्हाइकें घेऊन पळत होता.

तिसऱ्यांदाहि गंगाधरनें हैबतीच्या टांग्याला स्वाऱ्या नेताना बघितलें.

—आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं गंगाधर भाजी आणण्यासाठीं मंडईत निघाला तेव्हां—

हैबती टांगाच जोडीत होता.

" अरे हैबती, एवढ्या रामप्रहरींच धंद्याला निघायची काय गरज ? काल फार चैन होती ना ? " गंगाधरनें विचारलें.

" कसची हो ? "

" तुझा टांगा भरगच्च जाताना मीं पाहिला. "

" कसलं राव, चांगलीं स्टेशनचीं गिऱ्हाइकं मिळायची संधि होती, पण पोलिस इन्स्पेक्टरनं गाठलं. त्याचं पाहुणे जायचे होते रात्रीच्या गाडीनं ! करतां कसं ? बड्या अम्मलदाराला नाहीं म्हणता येतंय् थोडंच !"

" मग त्यानं पैसे नाहीं दिले ? "

" दमडीदेखील नाहीं ! हुद्याचे लोक ना हे ! याचा शब्द न ऐकून कसं परवडेल ? पोलिस अधिकाऱ्यांना दुखवून भागेल म्हणता ? "

गंगाधर वाटेला लागला.

त्याला असा संताप आला या फुकट्या लोकाचा— मोठमोठे श्रीमान् कां धरतात गरिबाना वेठीला ? धनिक काहीं झालं तरी ऐकणार नाहींत. गरिबानींच मोफत त्याचे कावाडकष्ट उचलायचे नाहींत असा चंग बांधला पाहिजे."

—अन् गंगाधरचे हे विचार त्याच्या वाड्याच्या उंबऱ्यापोतर इतके ळकट झाले कीं—

—त्या वेळीं तो म्हणाला सुद्धां, "बस्स्. निदान आपण कोणाहि ऐपत-दार मनुष्याचं थोडंहि काम फुकटावारी करणार नाहीं ! ठरला निश्चय."

इतकें गंगाधर मनाशीं म्हणतो न म्हणतो तोंच त्याच्या घराचा मालक तिथें आला. त्याच्या हातांत कसलेसे कागद होते. गंगाधरला त्यानें थांबण्यास सांगितलें.

" काय गंगाधरराव, कुठं गेलां होतांत ? " मालकांनीं विचारलें.

" मंडईतून आतांच येतों आहें. "

" भले ! मी तुम्हालाच पाहात होतों. तुम्ही टाइपराइटिंगच्या क्लासला जाता ना ? माझे एवढे कागद टाइप करून आणता का ? घराला चौथा मजला बांधावा म्हणतों, त्याविषयीं म्युनिसिपालटींत परवानगी मागण्यासाठीं अर्ज आहे. टाइप करून द्यायला एक आणा शीट मागतात. म्हटलं आहेत आपले गंगाधरराव ! कशाला व्यर्थ दवडा पैसे !... "

गंगाधरनें चांचरत का होईना मालकाजवळचे कागद हातांत घेतले ! करतां काय ! जागा चांगली होती ! भाडें बेताचें होतें...एवढ्यातेवढ्यासाठीं मालकाला का बिघडवा ?

आता हैबतीचा पेंच गंगाधरला सुटला.

---

# बांधावरल्या बाभळी : ७

चिदंबरपंत शेतावर गेले कीं आपल्या पिकानें दाटलेल्या शिवाराकडे डोळे भरून पाहात. त्यांना स्वतःची धन्यता वाटे. एके काळीं जिथें नुसतें पाण्याचें डबकें होतें, जिथें अहोरात्र बेडूक टाहो फोडीत नि म्हणूनच ज्याला ‘ बेडकांचें रान ’ म्हणत—

—आतां फक्त तें नांवच शिल्लक राहिलें होतें.

आसपासचे राडेरोडे जाऊन काळीभोर, कसदार, नांगरलेली नि सदैव चाललेल्या मोटांच्या पाण्यानें धुपलेली अशी लांबवर पसरलेली जमीन ! कागदी लिंबांचा बाग ! हळकुंडें ! भुईमूग ! शिवाय नेहमींचें जोंधळ्याचें पीक !

हें सर्व चिदंबरपंत हंसऱ्या वृत्तीनें बघत.

नि आजूबाजूस निरखतांना साहजिकच डाव्या हाताच्या बांधाकडे त्यांची दृष्टि वळे.

बांधावर तीन बाभळीचीं झाडें—

त्यांच्या पलीकडे सडक होती. बाभळी दिसतांच चिदंबरपंत मनाशीं म्हणत,

' ताईनं वेळींच हीं झाडं काढलीं असतीं तर आपल्याला आज नसत्या दगदगीला तोंड द्यावं लागलं नसतं—'

आणि एवढा वेळपर्यंत ताईला— थोरल्या बहिणीला— अजिबात विसरलेले चिंदंबरपंत बांधावरच्या बाभळींकडे न्याहाळताना तिची हटकून आठवण काढीत नि बहिणीबद्दल एखाद दुसरा उणा उद्गारहि त्याच्या मुखावाटे न कळत बाहेर पडे.

—— ताईचे यजमान डेपुटी होते. त्यानीं चिदंबरपंताची मराठी सातवीची परीक्षा कोऱ्या कागदावर पास करून घेतली. वशिल्याचा प्रभाव चिदंबर-पंतांना पहिल्यांदा हा असा लाभदायक झाला ! तरी पण पंतांनीं शिक्षण-क्रम चालवण्याची उमेद धरली नाहीं. ते म्हणाले,

" ट्रेनिंगचीं वर्षे माझ्याच्यानं झेपायचीं नाहींत. . . . "

—— मग चिदंबरपंत लोकल बोर्डाच्या शाळांतून वीस एके वीस, तेवीस एके तेवीस करीत खेडोखेडीं फिरले.

चिदंबरपंतांच्या बहिणीनें, आपल्या नवऱ्याच्या मागें कुणी नातगोत नसल्यामुळें, आपल्या बापाच्या वास्तूंत रहायचें ठरवून चिदंबरपंतांची शेती माहीतगार शेत्याच्या मदतीनें ऊर्जितावस्थेला आणली. जमिनीला पाणी लागावें म्हणून ताईनें पाण्यासारखा पैसा खर्च केला. उत्पन्नाची सुबत्ता ताईमुळें झाली— चिदंबरपंत नौकरीची खेडीवाडी सोडून राहत्या घरीं येऊं शकत नव्हते.

चिदंबरपंताचा वाडा एरवीं गावगुंडानीं विटा, खिडक्याच्या चौकटी, पटईचीं लाकडें, तुळया, फळया पसार करून इमला होता का नव्हता अशा स्थितीचा करून टाकला असता. केरकचऱ्याचे ढिगारे माजलेली ती बखळ बनली असती.

ताईनें घर-वावर राखलें. चिदंबरपंतांनीं शेतीच्या कामीं पैसे खर्च केले नाहींत असं नाहीं. पण फारच थोडे ! ताईचे पाचशे रुपये तर पंतांचे जेमतेम पन्नास !

—— एकुलती एक मुलगी होती चिदंबरपंतांना. तिला स्थळ ताईच्या नवऱ्याच्या वेळचा बोज— तेव्हांच्या ओळखी, म्हणूनच वास्तविक मिळालें.

अन् एवढें होतें तरी ताई गेल्यानंतर अकरा साडेअकरा रुपये पेन्शन बसून घरीं आलेले चिंदबरपंत ज्याच्या त्याच्यापुढें गोडवे गात,

" मीं प्रपंच अक्कलहुषारीनं केला ! एक लेक ! बिजवर का होईना, मूलबाळ नाहीं जांवयाला पहिल्या बायकोचं ! पी. डब्लू. डी.त हेडक्लार्क ! असा फाकडू जावई शोधला ! आमचे विनायकराव स्वभावानं अति सज्जन ! घर, घरचे जोंधळे—सालाचं हजार रुपयांला मरण नाहीं ! शिवाय तेलमिठाला रोख पगार आहेच ! आमच्या ताईनं पागोळ्याच पावसाचं पाणी आमच्या अंगणात पाडण्याची या खेटून वस्ती करणाऱ्या घरवाल्याची कामगिरी, खिडक्या दारं पाडणं अन् त्या बांधावरच्या बाभळी ही सगळी वादाचीं रणं माजवणारीं कारणं वेळेवारीच मारलीं नाहींत. माझ्या जिवाची स्वस्थता बिघडवली—"

चिंदबरपंतांच्या अंतरंगात सदा ताईनें जगवलेल्या बाभळीमुळें भविष्य-काळात होणाऱ्या नुकसानीविषयीं ऊहापोह चाले—

" त्या बाभळीच्या झाडांच्या पलीकडे रस्ता आहे तरी त्याला महत्त्व नाहीं. रस्त्याला लागून केवढं पडीक माळरान आहे. लढाईवरच्या सैनि-काना शेतमळे बक्षिस मिळणार आहेत. सरकारी पैसा जमवलेला. एखाद्यानं मधली वाट रद्द करून आपल्या लगत रानाचा पसारा पोचवता तो विहीर खणील. समजा आपल्या विहिरीच्या मुळावर ती आली. मोटा दोन मोटा पाणी किमानपक्षीं खालीं जाईल. कदाचित् आटेलहि आपली विहीर....

मुख्य म्हणजे बांधावरल्या बाभळींवरून भाडणें होतील—

आपल्या मुलाना...

छेः ! लेकीला ! जांवई विनायकराव हेच आपले चिरंजीव ! त्यांना जिंदगी बिनभानगडीची मिळावी. ताईनें ठेवल्या तशा कोणत्याहि खिस-खिसी मागें राहता कामा नयेत.

चिंदबरपंताना वाटलें कीं मिस्त्रीला बोलावून रस्त्याची मोजणी करून बाभळी कुणाच्या मालकीच्या ठरतात याचा अंदाज घ्यावा. पण—

तो विचार सोडला त्यांनीं—

मिस्त्री पैसेखाऊ आहे अशी त्याच्या नांवाची बोलवा झालेली

होती. सरकारकडून पुराव्याच्या अभावीं मिस्त्रीला नुसती समज मिळाल्याची गुणगुण लोकात होती.

तो भलतीच रक्कम मागेल नि ती दिल्यावरहि मोजणी होऊन आपल्याच ताब्यात झाडं असल्याचा निर्णय त्यानं दिल्यास ठीक. नाहीं तर—

मिस्त्री उलट्या काळजाचा आहे. रस्त्याची रुंदी मापताना बाधावरचीं झाडें सरकारचीं ठरवून पुष्कळ शेतकऱ्याचें त्यानें नुकसान केलें आहे असें गांवांत बोललें जात होतें.

बाधावरलीं बाभळीचीं झाडं आपल्याच कब्जातील आहेत ही चिदंबरपंताची कल्पना ! त्याच्या शेजारचा शेतकरी पिऱ्या. त्यानंहि कितीदां तरी हीच गोष्ट उचलून धरली. तो म्हणायचा,

" ह्यो बाभूळ तुमची हाय्. लई पुन्यवान् बामण तुमी– त्येच्या पायथ्यास्नी अश्शी मखाई हाय् ना. "

त्या तीन बाभळींपैकीं मधल्या झाडाखालीं पिऱ्याची मखाई होती. पिऱ्याची तिच्यावर भक्ति होती.

मनुष्य वरचेवर आपत्तींशीं झगडत असला कीं श्रद्धाशील बनतो. पिऱ्याचें तोकडें कोरडवाहू शेत ! पाण्यापावसावर, देवाच्या कृपेवर त्याचें जिणं अवलंबून !—

तो रोज देवीला आळवी. दरसाल शाळूचा हंगाम आला कीं पिऱ्या बोकड मखाईला बळी देई. त्याचा मनोमन भरवसा कीं मखाईच्या पाठिंब्यानें आपण सुखाचा घास खातोंय् !

पिऱ्या सडकेनें चाल जास्त होते म्हणून बामणाच्या शेतातून मखाईच्या दर्शनाला जाई. चिदंबरपंताना हें नको होतं.

——आणि या विचाराच्या उसळींतच बाभळी आपल्याच सत्तेच्या आहेत, त्या तोडायला हरकत नाहीं, हा निर्धार पक्का करून चिदंबरपंत स्वत: एक दिवस कुऱ्हाडीचे घाव घालायला निघाले असता——

——आऊत हांकणाऱ्या पिऱ्यानें बैल तिथेंच टाकून मखाईकडे धाव घेतली. तो काकुळतीनें म्हणाला,

" बामणा, पायी डोई हाय् — मानेला कुऱ्हाड हाण न् मंगशानी बाभळीला इजा कर. "

——ह्या पिऱ्याचा प्रत्यक्ष अडथळा झाल्यापासून चिदंबरपंताना बांधावरल्या बामळींची अधिकच तीव्रतेनें अडचण भासूं लागली.

——हरतऱ्हेनें या बाबतींत ते स्वतःशींच तर्ककुतर्क लढवीत.

——त्यांचे एक नातेवाईक पोलिस खात्यात होते. ते या भागांत असते तर दमबाजीनें शेतांतलें, गावांतलें अशीं दोन्ही कामें आपण साधलीं असतीं असेंहि चिदंबरपंतांच्या एकदां मनींमानसीं येऊन गेलें.

ओळखीनें अन् उतावळीनें मिळेल तें पदरांत पाडण्याची चिदंबरपंतांना खोड होती. केव्हां केव्हां ती घातुक ठरे. त्यांचे पोलिस खात्यांतील नातलग रेल्वेकडे असताना चिदंबरपंतांनीं हमेशा फुकट प्रवास केला. यामुळें एकदां त्या आप्तांच्या गळयाशीं यांचा पराक्रम बेतण्याची पाळी आली होती.

चिदंबरपंतांच्या बहिणीचे— ताईचे— यजमान शिक्षणखात्यांत डेप्युटी. त्यांच्या हुद्याचें दडपण निष्कारण कांहीं ठिकाणीं इरेला घालून मेव्हण्याच्या मोठेपणाला त्यांनीं कमीपणा आणला होता.

बांधावरच्या बाभळींवर चिदंबरपंतांचें लक्ष घरच्या त्रासामुळेंच वेधलें.

चिदंबरपंताचें गांवांतलें प्रशस्त घर— त्याच्या मागल्या परसात अडुळशाचीं झाडें होतीं. खरें पाहिलें तर चिंदबरपंतांच्या जागेंत तीं उगवलेलीं. पण पलीकडे राहणाऱ्या गावगुंडानें झाडें समाईक धरलीं नि तीं नाहींशीं करण्याच्या योजनेंत खो घातला ! पुढल्या अंगणांत शेजारच्या बिऱ्हाडानें रस्त्याच्या दिशेला पत्रे कलते बसवण्याऐवजीं यांच्या अंगणाकडे ते झुकते ठेवले. त्यामुळें पागोळ्या गळत. पाण्याची धार पडते तेवढी जागा आपलीच असें अट्टाहासानें तो धनी प्रतिपादूं लागला. त्यानें मोऱ्याचे निकाल करताना गटारें नेलीं तीं यांच्या अंगणातून. ताई बाई माणूस. तरी तिनें कोर्टकचेऱ्या करून मोऱ्यांचें पाणी जाणाऱ्या नळ्या वाटेल तेव्हां बुजवूं असें त्या घरवाल्याकडून लिहून घेतले. नंतर चिदंबरपंत आल्यावर एक जाळी पाडण्यांत आली तीहि ते बंद करूं शकले नाहींत ! मग त्याच्या बहिणीचें कर्तृत्व पुष्कळच नव्हे का ?

दुसऱ्या बगलेच्या शेजाऱ्यानें ताई यायच्या अगोदरपासूनच चिदंबरपंतांच्या अंगणांत दार पाडून ठेवलें होतें.

याबद्दल न् बांधावरचीं झाडें नाहींशीं केलीं नाहींत म्हणून ताईला भरपूर वाईटपणा चिदंबरपंत देत. मात्र व्यवस्थित ज्या गोष्टी झाल्या त्यांचा भलेपणा तिच्या वांट्याला बिलकूल न जाईल अशी खबरदारी ते बोलतांना राखीत.

घराच्या दोन्ही भितींना भिडलेले मालक गुंड होते. त्यांना ताळ्यावर आणण्याची खटपट आधीं करायला हवी होती. अशानें जाळींतून धूर आला नसता, खोदलेल्या दरवाजांतून मुलांनीं येऊन अंगणात घाण केली. नसती आणि चिदंबरपताच्या कुटुंबाचा— त्या कष्ट उपसणाऱ्या माउलीचा— तापत्रय किंचित् तरी कमी झाला असता !

परंतु या गांवगुंडांसमोर सपशेल लोटांगण घालून चिदंबरपंतानीं बाधावरल्या बाभळींच्या झाडांवर आपला रोख धरला. तीं तीन झाडं जणूं त्यांच्या अंतःकरणांत खुपूं लागलीं !

बाभळी वाढलेला बांध ओलाडल्यावर रहदारीची वाट होती. कुणीहि आंकड्यानें बाभळीच्या शेंगा-पाला शेळया-बकऱ्यांकरितां काढीत न् शेळ्या-बकरीं चिदंबरपंतांच्या मोटा शेतीकारिता झुळझूळ वाहणारे जें पाणी सोडीत तें पिण्यासाठीं धडपडत. बाभळीचे काटेहि टाचण्याऐवजीं सरकारी कचेऱ्यांत वापरायला कुणीं नेले ! म्हणजे झाडें त्याच्याच ताब्यातलीं झालीं कीं ? बाभळीचा डिंक... तो तर येणारे जाणारे सतत घेऊन जात ! पोरें गमतीनें तो खात देखील !

न् पिऱ्याची पिरपीर !—

तो रोज काम सुरू करायपूर्वीं मखाईच्या पाया पडायला येई.

आपल्या वावरांतून परका माणूस वावरतो हें काय ? उद्या ही वहिवाटीची पायवाट होणार नाहीं कशावरून ?

त्या तीन बाभळींचे सगळे कांटे टोंचूनही वेदना व्हायच्या नाहींत अशा यातनांनीं चिदंबरपंताचें हृदय व्यथित होऊं लागलें.

त्यांचा जांवई एकदां आला असतां मनाला बेचैन करणारी ही बाब त्यांनीं त्याला उलगडून सांगितली.

विनायकराव म्हणाले,

" जाऊं द्या कीं ! तुम्हांला काय पाश आहेत ? नसत्या काळजा जिवाला लावून घेताहांत ? मजेंत दिवस काढा "

चिदंबरपंत बोलले,

" हें सरहद्दीवरचं पिल्लूं आहे. जीव खाणारच कधींतरी. माझ्या भुईच्या पट्ट्यात हीं झाडं येताहेत असं शेतकरी मानतात तंवरच नायनाट करूं यांचा. "

" इतकी तडकाफडकी कशाला हवी आहे ?" विनायकरावांनीं म्हटलें. " एक रजिष्टर अर्ज करून टाका. मोजणी कायदेशीर होऊं द्या. तुमचा अर्ज आमच्या ऑफिसांत येईल...."

" ऑ—खरंच कीं काय ? तुमच्या कचेरीशीं या बाभळींचीं पाळंमुळं जातात अं ? " चिदंबरपंतांनीं आनंदून विचारलें.

" हो. असिस्टंट इंजीनियरकडे विचार होण्यासाठीं अर्ज जाईल; त्याच्या सल्ल्यानें काय तें होईल. तरी पण नष्ट कां करतां हीं झाडं ? अनायसा हद्द दाखवायला बांधावर खडीं आहेत...कुंपण सभोंवार घालायला आणखी काटेरी झुडपं मिळतील, फाटाफाटा अधेंमधें सरपण मिळेल. "

" कसच काय न् कसचं काय !" चिदंबरपंत जावयास म्हणाले, " त्या मधल्या बाभळीला बुंधापाशीं शेंदूर लावलेला दगड आहे..."

" देव म्हणा कीं !" विनायकराव मधेंच बोलले. " तुम्हांला ताई देवमाणूस भेटली. गरिबींत देवाचा धावा करावा लागला नाहीं. बाकीच्या शेंकडो दुबळयाचा शेंदूर फासलेला दगडच आधार आहे."

" रस्त्याच्या बाजूनं तो दिसतो." ताईच्या स्तुतीचें भाषण न आवडून चिदंबरपंत म्हणाले, " ती पिऱ्याची मखाई म्हणे. तो नागऱ्या नेमबंद डोकं घासतो तिथं. "

विनायकरावानीं त्या बाभळी, मखाईदेवी...सारें समक्ष नजरेखालीं घातलें अन् म्हटलें, " माझ्या मतानं तुम्हीं हा नादच सोडावा हें उत्तम. मीं तुम्हाला शिकवावं असं नाहीं, पण दैवांत असलं तर नसलेलं आपलं होतं. उलटीहि प्रचीति येते."

चिदंबरपंत उत्तरादाखल हंसले नि म्हणाले,

" तुमच्याकडेच अर्ज केला तर जाणार आहे. एकूण एक सुयंत्र घडेल. चिंता नाही."

चिंदबरपंतांनीं रजिष्टर अर्ज टाकला. त्याचें उत्तर नाहीं! ओव्हरसीअरच्या हाताखालच्या मिस्त्रीला चिंदबरपंतानीं दरडावणीचें पत्र लिहिलें. त्यातताबडतोब काम व्हावें या बुद्धीनें त्यानीं विनायकरावांच्या नावाचा, पी. डब्ल्यू. डी. ऑफिसात त्याच्या असलेल्या वजनाचा, मुद्दाम उल्लेख केला होता.

मिस्त्रीला भेटून पण कामाची तड लागेना.

शेवटीं चिंदबरपंतानीं रोजानें गडी लावून स्वतःच्या देखरेखीखालीं बाभळींचे समूळ उच्चाटन करवलें.

पिऱ्याच्या गयावया वाया गेल्या. त्याच्या भाविकपणाला धक्का बसला. त्यानें हळहळत पाटलाला गाठलें. भाविक माणसं श्रद्धा डिवचली गेली कीं कमालीचीं खवळतात. पिऱ्याने बामणाला लाख शिव्या मोजल्या!

गावपाटलानें बाभळी सरकारी मुलखातल्या ठरवून सर्व प्रकरण वरती पाठवलें.

पांचसहा दिवसातच ओव्हरसीअर अन् मिस्त्री चिंदबरपंताच्या घरीं आले. ओव्हरसीअर म्हणाले,

" पोलिसानीं आमच्या खात्यात तपासासाठीं त्याना कळलेली हकीगत धाडली. आमच्या पी. डब्ल्यू डी. च्या ताब्यात तीं झाडं येतात. सरकारी हुकुमावाचून बाभळी तोडल्या गेल्या. त्याची किंमत दोनशें रुपये मोजा. नाहीं तर गुन्ह्याचा पोलिसातर्फें पंचनामा करवतों. खटला होईल."

" मीं रजिष्टर अर्ज केला होता त्याची स्थळप्रत मजजवळ आहे. तुमच्या कचेरींत तो गडप झाला. दीड दमडीचा वीस पंचवीस रुपयाचा माल न् दोनशें रुपये मागता? पोलिसाना काय करायचं तें करूं द्या. लाकडाचा लिलाव पुकारा. ओंडे—बाभळीच्या फाद्या!...तिथंच पडलाय् ढीग."

हें बेफिकिरीनें बोलताना विनायकराव पी. डब्ल्यू. डी. च्या ऑफिसांत आहेत तेव्हा शेवट सरळच होणार याची चिंदबरपंताना खात्री होती.

चिंदबरपंत हेका सोडीनात तेव्हां सर्व लवाजमा शेतावर गेला.

एकेकाचे साक्षीपुरावे पोलिसांनीं घेतले.

मिस्त्रीविरुद्ध बोमाटेच बोभाटे होते, त्यांत ही भर पडायची होती !

मंडळींना वाटलें हें मिस्त्रीवर खास शेकणार !

याच दत्ताला भिणाऱ्या आणि स्वतःवरचे आजवरचे आरोप नाशाबीत ठरवण्याची संधि शोधीत असलेल्या मिस्त्रीनें साक्षींत सांगितलें,

" मला लाचखाऊ उगीच म्हणतात. याच घडामोडी बघा. चिदंबरपंतांचा जांवई पी. डब्ल्यू. डी. त हेड क्लार्क आहे. असिस्टंट इंजीनियरला लावायला हा वशिला या सासऱ्यानं, चिदंबरपंतांनीं, आणला. मी न्यायनिष्ठुर राहिलों. हें पहा आरोपीचं पत्र."

तें पत्र दाखल करून घेण्यात आलें. आता मात्र चिदंबरपंत जरासे बावरले. आपल्या नात्याच्या पोलिस अधिकाऱ्याचा हवाला देऊन फिर्याद काढून घेण्याची त्यांनीं खटपट केली. पण ते आणखी जाळ्यात अडकत चालले ! त्यांचा वशिलेबाज स्वभाव उघडा झाला.

अन् या बाभळतोड फिर्यादीचें पर्यवसान असें घडलें कीं,—

वशिल्याला कुणीं वश होऊं नये याकरता धडा देण्याच्या हेतूनें मग विनायकरावांना नोकरीवरून बडतर्फ करण्यात आलें.

सगळीकडे छीः थूः होऊन बायकोला घेऊन सामानसुमानानिशीं चिदंबरपंताच्या गांवीं कायम वस्तीला येणारे विनायकराव मोटारतळावरच पहिल्याच सलामीला सासऱ्याच्या अंगावर खेकसले,

" छान केलंत. वीस रुपयाच्या बाभळीसाठीं माझी सरकारी नोकरी—पेन्शन—पत—सारं घालवलंत. माझ्या पहिल्या बायकोचा संसार सुखाचा झाला. तुमच्या लेकीचं नशीब हें असं. मी तरी काय करूं ? अर्ज मीं मुकाट्यानं दाबून ठेवला. मिस्त्री गैरविश्वासू तेव्हां असिस्टंट इंजिनीयरशीं सोईसोईनं बोलून आपसात मिटवणार होतों. जुना साहेब रजेवर होता तो यायच्या तारखेवर लक्ष देऊन होतों. नव्या तापट साहेबाला तुम्हीं चिडवलंत. मला कळवायचं माझं नांव लेखी गुंतवतांना. काय घाई उठली होती एवढी ? तुम्हांला व्यवहाराचा गंध नाहीं. बहीण होती तंवर निभलं झालं !"

घराच्या अंगणांत पाऊल घालतांच पुन्हां विनायकराव चिदंबरपंतांवर संतापले.

"हें दार, ती जाळी, या रोजच्या हरघडीं जाचणाऱ्या गैरसोयी सोसतां आहांत न् तीं झाडं माझ्या मुळावर आणलींत! जो तो माझ्याकडे बोट दाखवील. एवढ्या तेवढ्या नफ्यासाठीं जन्माची भाकरी गमावणारा माणूस ही अपकीर्ति माझ्या माथीं चिकटवलीत !"

चिदंबरपंतांची मुलगीसुद्धां आपल्या बापाला टोंचण्या टोमणे देई. पिऱ्या म्हणाला,

" मखाईची सावली बामणानं हिरावली. देवी कोपली. बामणाचा जांवई तिनं भाकरी तुकड्याला म्हाग क्येला. "

मखाईचा कडकपणा जाणवल्यानें तिचे भक्त वाढले. खूपजण चिदंबरपंतांच्या शेतांतूनच बांधावरल्या बाभळी होत्या तिथें मखाईला नवस बोलायला जात ! शेतामधल्या रहदारीचा उपसर्ग पूर्वीपेक्षा कितीतरी पट अधिक झाला !

हल्लीं बांधावरल्या बाभळींनीं चिदंबरपंताना पूर्णपणें झपाटलें आहे. एखाद्या भुतासारख्या त्या बाभळी चिदंबरपंतांच्या मानगुटीला बसल्या आहेत ! स्वप्नातदेखील उभ्या बाभळींचें अस्तित्व त्यांना भयभीत करतें !

प्रपंचांत धरलेल्या अभिमानाचा, आशा अपेक्षाचा चक्काचूर उडाल्यामुळें वैतागलेल्या, भयंकर उद्विग्न झालेल्या चिदंबरपंताना अलीकडे मधून मधून वेडाची लहर येते न् त्यांत ते ओरडत सुटतात--

' बांधावरच्या बाभळी ! ', ' बांधावरल्या बाभळी !! '

# केला यत्न, झाला यज्ञ : ८

" या चळवळींना ऊत आलाय सध्या– बंडाचा बेत दिसतोय्– हे नकाशे इथं कसे आले? " जमादारानीं खडसावून विचारलें.

—एकंदरींत सकाळपासून घटनाच विचित्र घडत होत्या.

मागीलदारच्या अंगणातल्या गोठ्यांत बाजेवर रिकामीं पोतीं अंथरलेलीं, त्यावर एक घोंगडी टाकलेली, अशा अंथरुणावर पडल्या पडल्या दूध काढणाऱ्या गड्याशीं मणि गप्पा मारीत होता.

दूध गिऱ्हाइकास खात्रीचें मिळावें या भावनेनें पहाटे न् संध्याकाळीं मणि अशी रोज देखरेख करी.

नेहमींहून तो आज लौकरच दुसऱ्या उद्योगाला लागणार होता. त्याच्या बहिणीचें लग्न ठरलें होतें. तीथ नक्की करायला मणीला पुण्यास जायचे होतें, परंतु उजाडतांच नवीन विघ्न उपस्थित झालें.

पोलिस जमादार त्याजकडे अचानक झडतीला आले. मणीस आश्चर्य वाटलें.

त्यानें जमादारास वस्तु न् वस्तु दाखवली.

घर तपासून जमादार गोठ्याकडे वळले.

हें पाहा, तें पाहा असें चालू असतां मणि मघाशीं बाजेवर लवंडला होता तिथें उशाखालीं कागदांचीं मेंडोळीं निघालीं.

आसपासच्या खेड्यावाड्यातल्या जमिनींचे नकाशे होते ते.

जमादाराच्या चौकशीला काय जबाब द्यावा, आपण निरपराधी आहोंत हें कसें शाबीद करावें, तेंच मणीला कोडें पडलें. तो विलक्षण बावरून गेला होता.

मात्र 'मला ठाऊक नाहीं' हें दुसऱ्यादा म्हणतांना मणीच्या डोक्यात कसला तरी एकदम प्रकाश पडून तो शातपणें बोलला,

"—पण नकाशे मला कशाला हवेत? तलाठ्याच्या ते कामाला येतील कदाचित्."

मणीच्या अंदाजाप्रमाणें पराशर तलाठी न् त्याचा मुलगा हे आपल्या जागेंत उभे राहून सारा प्रकार न्याहाळत होतेच.

पराशरबाबा खेकसला,

"अरे भामट्या, माझे नकाशे— मीं ठेवले काय ते. ऐकलंत जमादार-साहेब?"

१९४२ मधल्या परिस्थितीचें वारें देशभर पसरलेलें. क्षुल्लक कारणा-करता कित्येकजण पकडले जात होते.

—संशयावरून मणीला पोलिस ठाण्याकडे नेण्यात आलें.

मणीची बहीण कावेरी घाबरली! मणीच्या आईचा ऊर आता पुढें काय होणार या विचारानें धडधडूं लागले.

*　　*　　*

बी. एजी.पर्यंत शिक्षण घेऊन मणीनें चिंचोणें गांवांत पाय ठेवला. शेतकीची माहिती करून घेऊन खेडें सुधारण्याची आपली महत्त्वाकांक्षा मणीनें आपल्या गावच्या घराशेजारीं राहणाऱ्या पराशरबाबाजवळ भोळे-पणानें बोलून दाखवली होती. पराशरबाबा हा मणीच्या चुलत-चुलत घराण्यातला वंशज. पूर्वीपासून तो चिंचोण्यातच होता. त्याचा गावात दबदबा असल्याचें मणि ऐकत होता. तालुक्याच्या गावचे डॉक्टर, वकील, सरकारी नोकर यांचें न् पराशरबाबाचें चांगलें सूत होतें. पराशर

बाबामुळें आपलें खेड्यांतलें कार्य अधिक नेटानें चालेल अशी मणीची खात्री होती.

—मागें पट्टीच्या वसुलीचा भरणा सरकारी तिजोरींत पराशरबाबानें केला नाहीं. त्या वेळीं मोठा गहन प्रसंग गुदरला. मणीच्या वडलांनींच तलाठ्याला पैसे दिले न् म्हणून पराशरबाबाचा तुरुंगवास चुकला होता.

ही जाणीव ठेवून पराशरबाबा आपल्या प्रयत्नांत साहाय्य करील ही मणीची चिंचोण्याला येण्याअगोदरची अटकळ होती.

खेडेगावांतल्या जीवनाचें कांहीं कांहीं तरुण जीवांना भारी आकर्षण वाटतें. अशापैकींच मणी एकजण होता. शेतकऱ्याना अज्ञानांतून मुक्त करण्याची त्याला तळमळ होती. तो नेहमीं ठांसून प्रतिपादन करी कीं—

" पेन्शनरानीं सेवानिवृत्त झाल्यावर शहरात नवीन बंगले उठवून न राहतां आपल्या वडलार्जित घरीं खेड्यात जावं. जगाचं वारं कोणत्या दिशेला वाहात आहे याची ओझरती जाणीव तिथल्या रहिवाशांना त्यानीं द्यावी. आपल्या अनुभवाचा अडाणी बांधवांना पेन्शनरानीं अवश्य लाभ करून दिला पाहिजे. तें त्यांचं कर्तव्यच आहे—"

मणि स्वतः त्याच ध्येयानें प्रेरित होऊन सगळें आयुष्य चिंचोण्यांत घालवण्याच्या विचारांत होता. घरची शेतीभाती सुदैवानें आहे या अनुकूल परिस्थितीचा भरपूर उपयोग करून घेण्याची हिंमत त्यानें बांधली होती.

परंतु पराशरबाबाला मणि गांवात यायला नको होता. मणीचें घराणें श्रीमंत ! त्याचा बाप, त्याचे आजोबा-पणजोबा खेड्यांत आले नव्हते—चिंचोण्यातल्या उत्पन्नाकडे त्यानीं पैशाच्या लोभानें कधीं पाहिलें नाहीं. पट्टी तेवढी भरून बाकीचें शेतीचें धान्यधुन्य पराशरबाबा कर्ता झाल्यापासून गडप करीत होता. चिंचोण्यांतलें मणीचें घर तो हक्कानें वापरी.

या सवलती मणीच्या येण्यानें नाहींशा झाल्या.

पराशरबाबानें कुटाळ कारवाया योजून शक्य त्या रीतीनें मणीला चिंचोण्यातून हाकलायचें ठरवलें.

पराशरबाबा हा एक त्याच्या कल्पनांना खोडा होता. चिंचोणें गांवांतल्या या गुंडानें मणीस जेरीला आणण्याचें व्रतच घेतलें होतें.

साक्षरताप्रसाराचा वर्ग मणीनें चिंचोण्यांत जातांक्षणीं सुरू केला—

शेतकऱ्यांना पहिल्यानें बळेंच आणावें लागे. मणि नवखा नि अंमळ बुजरा पडला ! लाज बोथट होऊन गुंडाना तोंड द्यायला आवश्यक ती मनाची सामग्री त्याच्यापाशीं जमण्यास बऱ्याच वर्षांचा अवधि लोटायला हवा होता. मुख्य हेंच साक्षरताप्रसाराच्या कार्यांत नडलें. पराशरबाबा तिथें तलाठी असल्यानें शेताशेतात वसुलीकरता फिरतांना त्यानें मणीची टर उडवण्याचा क्रम चालू ठेवला. तलाठी जिथें तिथें म्हणायचा,

" शेतकऱ्याचा गुरु गोठ्यात असतो, मणीच्या शाळेंत नसतो. "

दुसऱ्या कुणाचा हातभार नसलेला मणि शेतकऱ्याची उदासी पाहून हतबल झाला. त्याचा वर्ग बंद पडला.

शेतीच्या आनुषंगिक धंदा दुधाचा !

शाळा मास्तर व चिंचोण्यातल्या मोटर स्टँडवरच्या लहानशा हॉटेलचा मालक हे मणीकडून दूध घेत. त्यानें घराच्या मागल्या परसात पराशर-बाबाच्या बाजूला कुंपण घालून गोठा बांधला. पराशरबाबा मत्सरानें दुधाच्या चरवीकडे बघे– पण नुसत्या जलाल दृष्टीनें दुधाचें विष थोडेंच बनणार होतें ?

मणीनें चिंचोण्यांत एक पिठाची गिरणी काढली. तिचा भक् भक् असा आवाज येई. यानें गावाला कटकट होते अशा तक्रारीचा आपल्या ओळखीपाळखीच्या इसमाच्या सह्यानीं न् अंगठ्यानीं विभूषित असा अर्ज पराशरबाबानें मामलेदाराकडे धाडला.

पराशर तलाठी त्या मुलखातला ! मामलेदाराना त्याचे हरप्रकारचें साहाय्य होई. म्हणून तर तलाठी आपल्या राहत्या गावीं पुष्कळ वर्षे टिकून होता.

गिरणी गांवाबाहेर न्यावी असें मामलेदारानीं मणीला फर्मावलें. धंद्याला नवीनच सुरवात झालेली ! दळण फारसें येत नसे– न् तें गांवची वेस ओलांडून कोण आणणार ?

—एकंदर व्याप आटोपता घेऊन मणीनें खोट खाऊन गिरणीचे यंत्र विकलें.

चिंचोण्यात कथापुराण नव्हतें. मणीची आई पहाटेच उठून गोड भूपाळ्या म्हणे.

आसपासचे रहिवाशी रामप्रहरीं ईश्वराचें नांव अनायासें कानांवर पडतें म्हणून मणीच्या आईस धन्यवाद देत.

‘ रामनाम मनांत घ्यावें. आरडाओरड, देवभक्तीचा तमाशा कशाला ? आमची झोंपमोड होते ’ इत्यादि वाक्यें गिचमीड अक्षरात लिहिलेलें चिठोरें मणीच्या घरांत त्याच्या समोरूनच कुठून तरी भिरभिरत आलें. त्याला मनस्वीं वाईट वाटलें— चिठ्ठीचे त्यानें तुकडे तुकडे केले. आईचें अंतःकरण दुखावेल या भयानें पराशरबाबाचा हा नीचपणा मणीनें गुप्त राखला.

मागल्या अंगणांत सरतेशेवटीं जो गोठा होता त्यांत पराशरबाबाच्या कुंपणालगत कडब्याचा सांठपा असे. सर्पण काटुक तिथेंच प्रथम होतें. परंतु लांकडें वरचेवर कमी होतात असें आढळलें, तेव्हा मणीची आई विंचूकाट्याचा धोका पत्करूनहि लाकुडफाटा घरांत रचूं लागली. मणीच्या अंगणांतलें कांहींहि सामान बोटभर हद्दीपलीकडे गेलें कीं पराशरबाबा कुरकुरे. जिवाला अणखर बसेल असं कांहींतरी तो बडबडे.

भाडणाच्या मुख्य मुख्य बाबींमधें पाण्याचा आड मणि न् पराशर-बाबा याच्या सलोख्याच्या चागलाच आड येई. आड पराशरबाबाच्या टापूंत होता. तिथें गेलें कीं तो भुणभुण चालू ठेवी. सार्वजनिक विहिरीचें पाणी आणावें न् पुढेंमागें स्वतःच्याच अंगणात पाणी लागतें का तें पाहावें असाहि विचार कित्येकदा मणीच्या डोक्यांत आला. परंतु तूर्त म्हशीला प्यायला बादल्या बादल्या पाणी लागे तें जवळूनच घेणें सोइस्कर होतें. यांतहि तोड काढून पराशरबाबाशीं संबंध नको या हेतूनें मणीनें मधोमध भिंत बांधायचें ठरवलें. एक दार जाण्यायेण्यापुरतें तो ठेवणार होता. काम झालें कीं लगेच दार मिटवून घ्यायचें अशी व्यवस्था मणीनें आंखली होती.

गोठ्याच्या कडेला कडबा होताच. त्याच्या अलीकडे दाराच्या मापाची जागा सोडून भिंतीचा पाया खणायला घेण्यांत आला.

बांधली जाणारी भिंत मणीच्या हद्दींत होती— मणीच्या ती सर्वस्वीं मालकीची होती.

एका मध्यरात्रीं मागल्या अंगणात ‘ ठोक् ठोक् ’ असा आवाज येत होता. मणि कुतूहलानें पाहायला गेला.

पराशरबाबा स्वतःकडच्या बाजूला खुंट्या बसवीत होता.

मणि रागानें तापला. आपण आपल्या खर्चानें भिंत उभारली. तिच्या आधारावर तिकडे खोल्या काढण्याची आगाऊ तयारी खुंट्या ठोकून चाललीय अं·—

मणि पलीकडे गेला. पराशरबाबानें बसवलेल्या सगळ्या खुंट्या तो उपटीत चालला.

हें ध्यानांत येतांच पराशरबाबानें हातांतला कंदील मणीच्या डोक्यावर उगारला.

पराशरबाबा अशा मारामाऱ्या घडवून आणणारा नि स्वतः खेळलेला! मणीला बरेच तडाखे बसले! एवढ्यावर भागलें नाहीं. पराशरबाबानें मणीला जन्माची इजा करण्यासाठीं आडाच्या दिशेला ओढीत चालवलें.

मणीनें पायांनीं पराशरबाबाचीं पावलें घट्ट दाबून धरलीं न् म्हशीचें काम करण्याकरता त्याच्या पदरीं गडी होता त्याला हांक मारली.

खडाजंगी उडाली. पराशरबाबा घराकडे पळाला. मणीनें त्याचा पडलेला कंदील उचलून त्याचा पाठलाग चालवला.

अगदीं अंधारातल्या बळदांत पराशरबाबा उतरला. मणि पण त्याच्या मागोमाग धावला.

झटापट झाली. आधींच तडकलेली कंदिलाची काच फुटली. एक भरलेले पोतें पेटलें. साखर बाहेर आली.

मणीनें पाहिलें. तो चपापला. मणीला मारणारा पराशरबाबा आतां त्याला जायला विनवीत होता. मणि निघून गेला.

——तो कांहीं दिवस बैलगाडींतून औषध घेण्यास दवाखान्यात जात होता. फिर्याद गुदरायचा बेत ठरवून त्यानें डॉक्टरजवळ सर्टिफिकेट मागितलें. पाठीवर दोरीचे वळ उठल्याचेंच फक्त डॉक्टरनें लिहून दिलें.

पराशरबाबास मात्र जुन्या खोचा, खोका, निरनिराळ्या दंगलींत झालेल्या जखमा, मणीनें झटापटींत केल्या असें डॉक्टरचें शिफारसपत्र मिळालें.

या भक्कम पुराव्यावर उलटी पराशरबाबानेंच फौजदारी केली. या खटल्यांत मणि शेकला जाणार असें कायदे जाणणारे आपसांत म्हणत होते.

याच सुमारास युद्धकालांतील शिधा वाटण्याच्या पद्धतीस नुकताच प्रारंभ झाला होता. सुरवातीला सरकारनें धान्य शेतकऱ्यापासून वसूल करण्याचीं कंत्राटें काहीं मक्तेदाराना दिलीं. चिंचोणें गावाकडच्या भागातल्या कंत्राटदाराचा हस्तक पराशर तलाठी होता.

वास्तविक दर एकराला सहा पायल्या धान्य कररूपानें द्यायचें असा सरकारी नियम आहे. मणीनें शेतकऱ्यात प्रचार चालवला.

‘ कायद्यानें इकडच्या शेताना काहींच कर बसत नाहीं. भीमथडी, शिरूर पेटा यासारखीं खेड तालुक्यात लाबरुंद वावरें नाहींत. अंगावरच्याप्रमाणें शेतीच्या लंगोट्याच आहेत. या पट्टयांत पीक ध्यानात घेता साळीवरच किंचित् कर घेता येईल. शेत्याचें गाढ अज्ञान नडतें आहे. वाटेल तसें धान्य कंत्राटदार मागतात. हे देतात. ज्वारी ओली म्हणून दोन मणाचें पोतें पावणेदोन मण धरलें जातें. खरी घट शेरा सव्वा शेराची येते. तीहि धान्य पाच सहा महिने राहिल्याने भरून निघते. कंत्राटवाल्याचे साथीदार मधल्यामधे रॉकेल तेलाची गळ, धान्याची घट याचा नफा मारीत असले पाहिजेत. ’

बिचाऱ्या गावकऱ्याला पावशेर तांदूळ न् तीन शेर इतर धान्य आठवड्याला मिळे. रॉकेल साखर रेशनवरच. शिधा वाटण्याचे आठवडे महिन्याचे चार धरीत. शहरांसारखा वारावर आठवडा नसल्याकारणानें प्रत्येक महिन्याचे अखेरचे दोन तीन दिवस फुकट जात.

मणीनें या शिधापद्धतीची कसून चौकशी केली. सातबाऱ्याच्या उताऱ्याला ज्याची जमीन नाहीं त्याच्या नांवचें धान्य ठेवण्यात येत होतें अन् कुठें तरी तें गडप होई.

शेतकऱ्याच्या हातीं शिधापत्रिका यायची तलाठ्याकडून. तो चार रुपये तरी दक्षिणा घेत असे. मामलेदार कचेरींतल्या शिक्के मारणाऱ्या गड्यालाहि दाम मोजावा लागे.

बटाटे शेतकरी पिकवणार ! त्यानीं गाड्या भरून मापासाठीं सरकारी गुदामावर आणाव्या. मापाला गाडी येण्याचा पांच रुपये आकार भरला तरच काम त्वरित व्हायचें, नाहीं तर दिवसच्या दिवस ताटकळत बसूनहि श्रम व्यर्थ जायचे !

कायद्याच्या बागुलबोवाला भिऊन शेत्ये आजहि हे हाल निमूट सोसताहेत.

मणीचें अंतःकरण तिळतिळ तुटे. त्यानें गावात जागृति करण्याचा प्रयत्न चालवला.

धान्यवसुलीची कामगिरी पार पाडणाऱ्या पराशरबाबाच्या नजरेंत मणि खुपूं लागला.

पराशरबाबा आपलें दुखणें मामलेदाराना सविस्तर सागून म्हणाला,

“ हा मणि रगरूटभरतीविरुद्ध बोलतो. कॉंग्रेसचे चळवळे चिंचोण्यांत आले कीं त्याच्याकडेच उतरतात. माझ्या नजीकच राहतो ना तो—”

या विषयावर आणखीहि मामलेदाराशीं पराशरबाबानें चर्चा केली.

—आणि त्याचा परिणाम म्हणजे नकाशे बाळगल्यावरून मणीला झालेली अटक.—

—कावेरीचें लग्न जुळल्यासारखें होतें. मुलगा सरकारी नोकर असलेला, मॅट्रिकपर्यंत शिकलेला, घरचा सधन, असें स्थळ होतें. मुहूर्तच फक्त नक्की करायला मणीला पुण्यास जायचें होतें.

—एकाएकीं ही भानगड उपस्थित झाली.

मणीचा होरा धावत होता—

‘ पराशरबाबाच्या मुलाला मुली सागून येत नाहींत. व्यक्तीची कीर्ति ही अशी. कोण मुलगी देणार ? कावेरीचा विवाह ठरल्याचे भिंतीला कान देऊन ऐकून तर यानें ही कारवाई रचली नाहीं ? ’

कधीं कावेरीला, कधीं तिच्या आईला पाण्याला-धुण्याला आडावर जावें लागे.

पराशरबाबाच्या देखत त्याचा मुलगा, पराशरबाबाचे मित्र, त्याची कुचेष्टा करीत.

सुदैवाने मणि अचानक जामिनावर सुटला.

त्यानें कानानेंच घाणेरडी थट्टामस्करी ऐकली.

पराशरबाबाविषयींचा त्याच्या मनांतला संताप आणखी वाढला.

चिंचोणें सुधारायचें तर तलाठ्याला अद्दल घडवली पाहिजे. बदलूनहि जात नाहीं हा--

मणीचा कांहीं निश्चय झाला.

पराशरबाबा वसुलीकरतां फिरतीवर गेला असतां एका रात्रीं मणि दिवा घेऊन त्याच्या घरांत गेला.

मागें पराशरबाबाची न् त्याची झोंबाझोंबी झाली. पोतें दिव्याच्या ज्योतीनें पेटले... साखर सांडली... त्या बळदांत मणि गेला.

धान्याचीं अन् साखरेचीं पोतीं किती सांठवलीं आहेत तो नेमका आंकडाच त्यानें काढला.

पुढें मणीनें जो बेत योजला होता त्याबाबत त्यानें आईची संमति विचारली, पण तिचें म्हणणें पडलें कीं मिळतें घ्यावें. ती बोलली,

" झालं एवढं बस्स झालं...तूं संभाळून राहा. आगीवर पाय देऊं नकोस...नोकरी घर शहरांत...इथं देव नाहीं दैत्यांशीं संगत...हा एखाद दिवशीं खूनसुद्धां करील कुणाचा तरी..."

पण—

आईच्या न् बहिणीच्या श्वासाला, आपल्या हालअपेष्टांना कारणीभूत होणाऱ्या वैऱ्याला ठोका द्यावा, एका गांवगुंडाला नेस्तनाबूद करून खेडे-गांवच्या उन्नतीचीं स्वप्नें प्रत्यक्षांत उतरवावीं, जनसेवेचें पुण्य संपादावें, कच खाऊं नये, असें मणीला निश्चित वाटूं लागलें.

चिंचोण्याच्या पोलिस पाटलाला न् मामलेदारांना समक्ष भेटून त्यानें साखरेच्या सांठ्याची वर्दी दिली.

पोलिसपार्टी सत्वर निघायला हवी होती. पण पराशरबाबा फिरतीहून परत आल्यानंतर चारपांच दिवसांनीं पोलिस शिपाई आले.

पराशरबाबाची जागा त्यांनीं उलथीपालथी घातली—

पराशरबाबा साखरेचा डबा दाखवीत म्हणाला,

" या पोलिसपाटलांना, मामलेदार-फौजदारसाहेबांना, सगळ्यांना चहा द्यायला पाहिजे, पण साखरच नाहीं ! "

मणीच्या सूचनेप्रमाणें पोलिसांनीं बळदाचा कोनाकोपरा शोधला—पराशरबाबाचें घर तपासलें, त्याच्याकडे चिमूटभर साखर नव्हती.

फौजदार-मामलेदारांना पराशरबाबा बोलला,

" साहेब, नातेवाईक म्हणून मणीची मी गय केली तर माझ्यावरच

खोटा आळ. या घटकेला मणीची घटका भरेल, त्याच्या घरांत ज्वारीचीं अन् साळीचीं रगड पोतीं तुम्हांला दिसतील."

पोलिस शिपायांनीं धान्याच्या पोत्यांसारख्या ढोबळ वस्तूकरतां मणीच्या वास्तूंतले बारीक कोनाडेहि चांचपले.

आतां म्हशीच्या गोठ्याकडे सगळ्यांचा मोर्चा वळला होता.

"गेल्या खेपेला जमादार आले होते—बाजेवर पोतीं अंथरलेलीं! आतांहि दिसताहेत पाहा तीं. गोठ्यांत रिकामीं पोतीं कशाला हो? खास इथंच डाव आहे!" पराशरबाबानें कसून शोधायला अप्रत्यक्षपणें सुचवलें.

कुठेंहि धान्याचा दाणा त्याना आढळेना.

"अहो ही कडब्याची गंज पहा. वरून गुराना खायच्या पेंड्या पण आंत माणसानीं खायचे जिन्नस आहेत." पराशरबाबाच्या तोंडाळपणाला वरचेवर भरती येत होती.

मणि निर्धास्त होता. पराशरबाबाच्या बरळण्याला किंमत नाहीं असें दर्शविणारें हास्य त्यानें केलें.

तोंच—

मणि एकदम चमकला—

—गंभीर झाला.

पोलिसाना ज्वारीचें पोत्यामागून पोतें सांपडूं लागलें. नऊ पोतीं होतीं.

भारतसंरक्षणकायद्याचा भंग! कडक शासनाला पात्र असा गुन्हा!

कुठल्या गुन्हेगाराला हातकड्या घालायच्या अन् कुठल्या नाहीं हें पोलिस अम्मलदारावर अवलंबून असतें—

पोलिसानीं मणीला धरून ठेवलें.

"मणिदादा..." कावेरी कावरीबावरी होऊन किंचाळली.

"घेऊन जा याला...याच्या हातांत बेड्या चढवा...त्या वळलेल्या मुठींनीं मला बुकलील तो...मला भिंत बांधतेवेळीं मारलं ती फिर्याद... नकाशे बाळगल्याचा आरोप...दोन गुन्हे आहेतच."

पराशरबाबा जखमेवर खसखसून मीठ चोळीत होता.

मणीची आई!

बिचारीनें टाहो फोडला. रडत रडत तिनें विनवणी भाकली,

" बाबा, तुमच्या नातलगाला वांचवा हो. तुम्हांला मागं मणीच्या बापानें संकटांतून तारलं. कांहींतरी उपकार स्मरा हो... तुम्ही जामीन राहा...उद्यां मणि तुरुंगांत गेला...कुळाचा लौकिक...कावेरीचं लग्न..."

" माझ्या मुलाचं लग्न व्हायचंय कीं ! " अत्यंत हलकटपणानें पराशर-बाबा उद्गारला.

मामलेदार, फौजदार, पोलिस पाटील पराशरबाबाच्या घरातली त्याच्याच वळणाची मंडळी,गांवातले बघे सारे कावेरीकडे पाहात फिदीफिदी हंसत सुटले.

मणि पराशरबाबावर तुटून पडणार होता– पोलिसांनीं त्याला शिकस्तीनें आवरलें होतें.

आजूबाजूचे लोक हंसताहेत, गांवगुंडाच्या टवाळीला प्रोत्साहन देताहेत, या दृश्यानें मणीला कसली तरी तीव्र जाणीव झाली.

" चिंचोण्यांतल्या लोकांसाठीं आपण तळमळतों. इथें जमलेले गांवकरी आपल्या बहिणीच्या चेष्टेत भागीदार आहेत. मी एक दिवस धरला गेलों तर परवा कावेरीची टिंगल झाली. या असहाय अबला...मी तुरुंगांत गेलों कीं कोण आहे याना ! कैदेंत देह झिजवणाऱ्या देशभक्तांचीं कुटुंबें हलाखींत जीवन जगतात...पराशरबाबाच्या बळदात नऊच पोतीं...साखरेचं त्यानं काय केलं. मी जगाच्या दृष्टीनं साठेबाज चोर ठरलों. कावेरीचं लग्न व्हाय-चंय. कसा काळ कंठतील या मायलेकी..."

अंतःकरणाला अतिशय वेदना होऊन मणि खिंकाळणाऱ्या पोलिसांना हिसका देत निसटला. तो पराशरबाबाकडे धावला.

—मारण्यासाठीं नव्हे.

पराशरबाबाच्या पायाला त्यानें हात लावले.

मणीची दीन मुद्रा– केविलवाणी चर्या–कठोरपणानें, काहींशा संतोषानें पाहात पराशरबाबा उपहासानें म्हणाला,

" हात जोडायला नकोत. बेडीनं ते कायमचे जोडले जातील. "

" बाबा, सोडा ना मला. "

मणीचा स्वर कांपरा झाला होता.

" जा. धान्य चोरतांना बरं वाटलं नाहीं का ! उद्यां वर्तमानपत्रांत नांव येईल...खेडेगांवांत कार्य करतंय माकड–"

" बाबा, बाबा ! नका असे घाव घालूं. मीं धान्य सांठवलं नाहीं. मी गुन्हेगार नाहीं. "

पोलिसानीं मणीला चावडीकडे चालवलें.

मणीच्या आईस मूर्च्छा आली. कावेरी ओक्साबोक्शीं रडत होती.

* * * *

मणि पकडला गेला त्या दिवसानतर ओळीनें सात दिवस चिंचोणें गावातल्या एकूण एक सार्वजनिक विहिरींचें पाणी इतकें गोड होतें कीं नुसतें तें उकळून चहाची पूड मिसळली कीं चहा तयार ! आठवडाभर हॉटेलमध्यें फारसें कुणी चहा प्यायलें नाहीं !

—या विलक्षण योगायोगाचा उल्लेख करून पराशरबाबा अनेकदां म्हणाला—

" देवाची कृपा ! मणि अंधारकोठडींत गेला न् परमेश्वर संतुष्ट झाला. पुन्हां मणि चिंचोण्यात यायला नको. "

खुद्द पराशरबाबाच्या आडात तर पाण्याचा पाक झाला होता ! कावेरीला, तिच्या आईला पाणी घ्यायला त्याने दंडेलीनें बंदी केल्यानें, त्याच्या घरातल्या माणसाखेरीज कोणासहि याचा थांगपत्ता नव्हता.

आडातलें साखरेचें पाणी वापरून केलेल्या खाद्यपदार्थांची मेजवानी पराशरबाबाकडे झोडल्यानंतरच मामलेदार-फौजदारानीं चिंचोणे सोडलें.

गावकऱ्यातला पोलिस पाटील तेवढा मेजवानीला होता.

* * * *

चिंचोणें येथील धान्यसाठ्याची हकीकत वर्तमानपत्रात जाहीर झाली. कावेरीचें लग्न मोडलें. वरपक्षाचें पुढील चार ओळींचे पत्र आलें होतें—

" आमचा मुलगा सरकारी नोकरदार...चोरीच्या आरोपावरून कैदेंत जाणाऱ्याच्या बहिणीला बायको करायला तो राजी नाहीं...आम्ही दिलगीर आहोंत. "

मणिच्या आईच्या काळजाला हा मजकूर झोंबला. आताशा मधून मधून तिचें डोकें फिरल्यासारखें होई, त्यात ती ' संसार दाणादाण झाला ' असा मंत्र जपत सुटे.

* * * *

या रेशनच्या खटल्यामुळें न् रिक्रूटभरतीस थोडीफार मदत केल्या-कारणानें पराशरबाबास सर्कल इन्स्पेक्टरची जागा मिळाली.

हल्लीं ते चिंचवडला आहेत. तीस गांवें त्यांच्याकडे आहेत. महिन्यांतून एकदा तरी त्याना प्रत्येक गावीं जावें लागतेंच.

व्यवसायाच्या या दगदगींतहि पराशरबाबांना मणीच्या शिक्षेचा प्रश्न भंडावून सोडीत आहे. मणीची वळण-वशिल्यानें जामिनावर मुक्तता होऊं नये, दंडावर भागूं नये, त्याला सक्तमजुरी व्हावी हा सर्कल इन्स्पेक्टरांचा मनोदय आहे आणि संकल्पसिद्धीसाठीं ते अविश्रान्त परिश्रम घेत आहेत.

# लो क क था

## केतकीचं फूल कोण तोडतंय ? १

एक राजा होता. त्याला मूल होत नव्हतें. गादीला वारस तर हवा होता. यासाठीं राजानें आणखी दोन लग्नें केलीं.

तीनही बायकांना मूलबाळ झालें नाहीं. शेवटीं नशिबाची परीक्षा पाहण्यासाठीं राजा चौथ्यांदा विवाहबद्ध झाला. कमला नांवाच्या एका सुस्वरूप राजकन्येशीं त्याचा विवाह झाला.

पहिल्याच वर्षी कमला राणी गर्भवती राहिली. तिच्या सवतींना हें पाहवेना. त्या कमलाराणीचा आंतून द्वेष करूं लागल्या.

मात्र आपला हेवादावा कोणत्याही रूपानें प्रकट होऊं नये अशी त्या खबरदारी घेत. त्यांच्या बोलण्या-वागण्यांत प्रेमळपणा ओतप्रोत भरलेला असे.

सवतींतली एकजण कमलाराणीला एकदां म्हणाली,

“ आपण चौघी कित्ती जिव्हाळ्यानं वागतों एकमेकींशीं— तूं धाकटी असून देखील कैकेयीप्रमाणं तुझं वर्तन नाहीं म्हणून दशरथाचा संसाराचा रथ छान चालला आहे...”

कमलाराणीच्या स्वभावांत डावपेंच नव्हते. ती साधीभोळी होती. लपलेलीं वाघनखें तिला कधीं दिसलीं नाहींत.

नऊ महिने गेले– प्रसूतीच्या अगोदर तिच्या थोरल्या सवतीनें कमला-राणीला सांगितलें,

" तूं डोळ्यांना फडकं बांध– तुला वेदना सहन व्हायच्या नाहींत; स्वतःचेच हाल तूं न बघितलेले बरे; तुझ्या डोळ्याचं फडकं नंतर आम्ही सोडवूं. तुला मूल दाखवूं."

हें मानभावीपणाचें बोलणें कमलाराणीला उमगलें नाहीं. तिनें प्रसूती-पूर्वी डोळे बांधू देण्यास आडकाठी केली नाहीं.

कमलाराणी जरी कैकेयीप्रमाणें नव्हती तरी तिच्या दासीवर मंथरेची दाट छाया होती.

सवतींची ती साथीदार बनली. कमलाराणीला मुलगा झाला तेव्हां तिच्या सवतींच्या सांगण्यावरून दासीनें मूल केळीच्या पानात गुंडाळलें न् नदीच्या बाजूला मोठा उकिरडा होता तिथें येणारा-जाणाराला न दिसेल अशा बेतानें कचऱ्याच्या ढिगात ठेविले !

डोळे सोडल्यावर कमलाराणीनें अधीर मनानें विचारलें,

" काय झालं मला ? –मुलगा का मुलगी ? कुठं आहे माझं बाळ ? रडत होत तें...! "

कमलाराणीच्या डोळ्याभोंवतालचा पदर निघाल्याबरोबर सवतींनीं डोळ्याना पदर लावले ! त्यातली एकजण म्हणाली,

" भूत ग, बाई भूत ! तुला झालं केरपोतेरं; तेंच रडल्याचा भास होत असेल–"

कमलेला अतिशय दुःख झालें. नऊ महिने शारीरिक कष्ट तिनें आनंदानें सोसले परंतु मनाचे क्लेश तिला सहन होईनात. ती दैवाला बोल लावीत बसली.

मूल दासीनें उकिरड्यात टाकल्यानंतर एक गरीब कुंभार पाणी आण-ण्यासाठीं नदीवर जात होता. एके ठिकाणीं उकिरड्यावरचा कचरा खालीं-वर होत असलेला त्याच्या दृष्टीला पडला. हें विचित्र वाटून कुंभारानें ती जागा तपासली. त्याला सुंदर राजबिंडा मुलगा आढळला.

तो गुदमरला होता. कुंभारानें त्याला स्वच्छ केलें.

तो त्याला घरीं घेऊन गेला.

—अशींच एक दोन वर्षें लोटलीं.

कमलाराणी पुनः गर्भवती झाली. तिच्या सवती मत्सरग्रस्त बनल्या. पण त्या वरकरणीं म्हणत,

" तूं मूल जन्मावयाच्या वेळीं डोळे बांधून घे. काय होईल तें आम्ही तुला दाखवूं. मागल्यासारखा वेडाविद्रा प्रकार घडला तर भिशील बिशील. "

सवतींच्या सल्ल्याप्रमाणें कमळाराणी वागली.

याहि खेपेला तिला मुलगा झाला होता. त्याला फिरून दासीनें केळीच्या पानात गुंडाळून नदीजवळच्या उकिरड्यामध्यें ठेवलें. मातेच्या पोटातून राजपुत्र मातींत गेला !

मागचाच कुंभार पाणी भरण्यास जात होता. त्यानें हालणारी माती पाहिली. त्याला संशय आला.

आणि दुसरा सुंदर मुलगा घेऊन कुंभार घरीं जाताना म्हणाला,

" राजाला मागं केरपोतरं झालं असं ऐकतो— गरीबाच्या घरीं खायची भ्रात आणि मला मुलं सापडताहेत !"

इकडे कमलाराणीनें डोळे उघडताक्षणीं केरपोतेरें तिच्या नजरेला पडलें !

सवती रडत तिला म्हणाल्या,

" हेंच तुला झालं...काय करावं बाई...डोळे बांधले म्हणून ठीक... खास भ्याली असतीस तूं..."

कमलाराणीचें काळीज पोळलें. देवाचें काहीं चुकलें असावें असा तिचा समज झाला. ती जास्त जास्त धर्मनिष्ठ होत चालली. राजाला देखील घडलेल्या गोष्टीबद्दल अत्यंत वाईट वाटलें.

अशींच आणखी दोनतीन वर्षें निघून गेलीं.

या वेळीं राणीला मुलगी झाली. पण सवतींनीं डोळे बांधण्याचेंच तंत्र तिला पटविलें होतें, त्यामुळें केरपोतेऱ्याखेरीज कमलाराणीला काहीं दिसलें नाहीं.

सवतींनीं रडण्याचें नाटक बेमालूम केलें होतें.

दासीनें केळीच्या पानात गुंडाळलेली राजकन्या उकिरड्यावर मातींत पडली.

त्या वाटेनें नदीला पाण्यासाठीं जाणाऱ्या कुंभाराला मातीची हालचाल

होत असलेली पाहून शंका आली. अन् मातींत सापडलेले मोती घेऊन कुंभार घराकडे गेला.

हीं तीन बालकें कुंभाराच्या घरीं वाढत होतीं.

कुंभाराचीं तीं मुलें प्रेमळपणानें वागत. त्यांना पोसण्याची कुंभाराची कुवत नसल्यानें मधून मधून तीं भिक्षा मागत. लोकांना तें दृश्य फारच करुणाजनक वाटे. रस्त्यानें फाटकेतुटके कपडे पेहरून चाललेलीं तीं बालकें पाहिलीं कीं लोक त्याना आपण होऊन भिक्षा वाढत.

ज्या दिवशीं कुंभाराला मूल सांपडायचें त्याच दिवशीं राणीला केर-पोतेरें झाल्याची बातमी कुंभाराला कळावी असें इजा–बिजा आणि तिजा झालें. यामुळें हीं राजबालकेंच असावींत असें कुंभाराला वाटत होतें. त्या भावंडाना कुंभारानें आपला कयास बोलून पण दाखविला होता. बाहेर याची वाच्यता करायला कुंभार धजत नव्हता. राजशासनाला तो घाबरत होता.

हीं मुलें नदीकडे नेहमीं खेळायला जात. एकदा त्यानीं कुंभाराच्या घरांतील लोखंडाचा घोडा बरोबर खेळण्यासाठीं नेला. घोड्याला पाणी पाजण्याचा मुलाचा यत्न होता.

त्या वेळीं राजवाड्यातली दासी लुगडें धुवायला नदीवर आली होती. ती मुलाची धडपड पाहून सहज म्हणाली,

" लोहाराचा घोडा कुठं पाणी पितो काय ? "

थोरला मुलगा लगेच उद्गारला,

" राजाच्या राणीला कधीं केरपोतेरं होईल काय ! "

हा जबाब ऐकताच दासी मुलाकडे न्याहाळून पाहूं लागली. आपण उकिरड्यावर टाकलेलीं मुलें हींच असावींत अशी स्पष्ट शंका तिला आली. हा संशय बळावायला आणखी कारण झालें.

—मुलें एक दिवस राजवाड्यावर भिक्षेसाठीं गेलीं. थोरला मुलगा मोठ्यानें म्हणाला,

" या नगरचा राजा<br>
त्याची धाकटी राणी<br>
तिचं नांव कमळाराणी ।<br>
तीन मुलं तिला झालीं,

केळीच्या पानीं गुंडाळलीं,
उकिरड्यावर फेकून दिलीं ॥
घाल माय भिक्षा ! ”

थोरल्या भावाचें ऐकून धाकट्या भावानें व बहिणीनें वरच्यासारखाच घोष केला.

दासीनें तें ऐकलें. तिनें कमळाराणीच्या सवतींना बोलावलें. त्यांनीं घाईघाईनें गड्याकडून मुलांना हाणीत मारीत राजवाड्याबाहेर काढलें. देवाची पूजाअर्चा करण्यात गढून गेलेल्या कमलाराणीला यापैकीं कांहीं कळलें नाहीं अशी सवतींची खात्री झाली. त्याना समाधान वाटलें.

सवतींनीं पुढें नेटानें तपास चालवला. कुंभाराच्या घरीं हीं मुलें राहातात असें समजतांच राजाचें मन त्याच्याविरुद्ध कलुषित करण्याचा प्रयत्न सुरू झाला. कमलाराणीच्या सवती राजाला म्हणत,

“ त्या कुंभाराचीं पोरं चेटूक करणारीं आहेत— कमलाराणीला केरपोतेंर त्या पोरट्याच्या कारवाईनंच झालं...त्याना मारण्याची आज्ञा व्हावी...”

तीन राण्यांनीं आळीपाळीनें सांगून राजाच्या मनात ही गोष्ट पक्की ठसवली. राजानें कुंभाराच्या मुलांचा वध करण्याचें फर्मान सोडलें.

कुंभाराचीं मुलें महारानीं पकडून नेलीं. त्यांच्या जबरदस्तीपुढें कुंभाराच्या विनवण्यांचा इलाज चालला नाहीं. तिघा मुलांना राजधानी-बाहेरच्या महादेवाच्या पडक्या देवळाकडे महार घेऊन चालले. बिचारीं बालकें अगदीं केविलवाण्या शब्दात कळवळून सांगत होतीं, “ आम्हाला मारूं नका. आम्हीं कुणाची खोडी केली नाहीं, कुणाच्या वाटेला आम्ही जात नाहीं. भीक घातली तर खातों. का हो मारता ? ”

त्यानीं विलक्षण घाबरून काढलेला आवाज अगदीं हृदयद्रावक होता. खऱ्या दगडाला देखील पाझर फुटला असता, परंतु सदा माणसें मारण्याचा व्यवसाय करून दगडासारख्या झालेल्या महाराच्या अंतःकरणावर कशाचाच परिणाम घडला नाहीं. त्यानीं देवळाच्या आवारात मुलांना खेचलें व त्यांचीं निर्दयपणें शिरकमलें उडवलीं.

—कांहीं दिवसांनीं तेथेंच आंब्याचीं दोन मोठीं झाडें निर्माण झालीं न् त्याच्या लगत एक केतकीचें झाड उगवलें.

केतकीला फार सुंदर फुलें येत असत. देवळात पूजा करायला येणारे भक्त शंकराला हीं फुलें वाहत.

केतकीच्या फुलाची कीर्ति राजाच्या कानीं गेली. त्यानें आपल्य नोकराना फुलें आणण्याकरिता पाठविलें.

नोकर केतकीच्या झाडाजवळ येताच केतकी म्हणते,

" बोल भाई आंब्या. "

" काय म्हणे केतकी ? " आंब्यानें विचारलें.

" केतकीचं फूल कोण तोडतंय् ? " केतकीनें प्रश्न केला.

" राजाचे नोकर. "

हें दुसऱ्या आंब्याच्या झाडाचें उत्तर ऐकताच केतकीचें झाड उंच गेलें. फुलें साहजिकच उंच गेलीं. नोकर आंब्याच्या झाडावर चढून फुलें काढण्याच्या खटपटींत असता धडाधड खालीं आपटले !

त्यांनीं सारा चमत्कार राजवाड्यात कळवला.

राजाच्या पहिल्या तीन बायकाना केतकीचीं फुलें अप्रतिम आहेत असें समजलें होतें. नोकर परत आले तेव्हा राजाला विचारून त्या फुलें मिळवायला गेल्या.

केतकीनें विचारलें,

" बोल भाई आंब्या. "

" काय म्हणे केतकी ? " आंब्यानें प्रश्न केला.

" केतकीचं फूल कोण तोडतंय् ? " केतकीनें सवाल टाकला. व—

" तुझ्या आईच्या दुष्मनिणी " असें दुसरा आंबा म्हणताच केतकी वठल्यासारखी झाली. तिच्या फुलांचा तजेला पार कुठल्या कुठें गेला. सारीं फुलें कोमेजून गळून पडलीं.

तीन राण्यांनीं केतकीचें झाड आणि आंब्याचीं झाडें तोडावीत असें राजाला सुचविलें. येथें काहीं राक्षसी माया असावी अशी राजाची खातरजमा झाली. त्यानें नोकर घेतले आणि पडक्या महादेवाच्या देवळाकडे मोर्चा वळवला.

राजा जवळ येत असताना आंब्याला केतकीनें विचारलें,

" बोल भाई आंब्या. "

" काय म्हणे केतकी ? " आंब्याच्या झाडानें पृच्छा केली.

" केतकीचं फूल कोण तोडतंय् ? " केतकीनें प्रश्न केला.

" राजा ! "

हा जबाब ऐकताक्षणीं केतकीच्या झाडावर एकच फूल होतें तें उंच गेलें--कोणाच्याही हातीं तें येईना.

राजा अत्यंत विस्मयचकित झाला.

हा ईश्वरी कोप असावा असें त्याला वाटलें. त्यानें कमलाराणीला बोलावणें धाडलें.

कमलाराणी साध्वी होती. देवधर्म, जपजाप्य यांत तिचा सारा काळ खर्च होत असे. होरपळलेला जीव तिनें परमेश्वराच्या भजन-पूजनाकडे लावला होता.

नवऱ्याच्या निरोपावरून ती फूल तोडण्यास आल्यावर--

" बोल भाई आंब्या, केतकीचं फूल कोण तोडतंय् ? " केतकीनें विचारिलें.

" आपली आई. " दोन्ही आंब्याचीं झाडें मोहरून म्हणालीं.

केतकीच्या झाडाला पानागणिक रसरसलेलीं टवटवीत फुलें आलीं. झाड पुष्पानीं नुसतें बहरून गेलें. कमलाराणीला हवीं तेवढीं फुलें घेता आलीं.

पण आतां कशाकडेच कमलाराणीचें लक्ष नव्हतें. आंब्या-केतकी-मधील संवाद ऐकून तिचा ऊर मातृप्रेमानें भरून आला होता. तिचें हृदय वात्सल्यानें दाटून गेलें होतें.

ती देहभान विसरून म्हणाली,

" केरपेतेरं नाहीं...मला मुलं झालीं...हीं माझींच लेंकरं हो ! "

राजाच्या मनांत प्रकाश पडला. कुंभाराचीं मुलें याच देवळाच्या आवारात महारांनीं मारल्याचें त्याला आठवलें.

नोकरांना परत पाठवून कमलाराणीशेजारीं राजा खिन्न होऊन बसला. दोघांनीं पुष्कळ शोक केला. अन्न-पाण्याला न शिवतां त्यांनीं महादेवाचें अनुष्ठान आरंभलें.

तीन दिवसांनंतर शंकर प्रसन्न झाले. त्यांनीं भक्तांचा मनोदय ओळखला.

आंब्याचीं झाडें व केतकीचें झाड हीं अदृश्य झालीं. तीन भावंडें फाटकीं वस्त्रें अंगावर, उपाशींपोटीं अशा अवस्थेंत आईकडे धांवत धांवत आलीं.

त्यांची स्थिति पाहून कमलाराणी गहिंवरली.

राजानें कमलाराणीचें सांत्वन केलें. मुलें बापाला भेटलीं. राजाला अत्यानंद झाला.

कमलाराणीनें मध्यस्थी केल्यानेंच तिच्या सवतींना व दासीला कडक शिक्षा व्हायची टळली. राजानें त्यांना राज्यातून हाकून लावलें.

कुंभाराला इनाम मिळालें. त्याची जन्माची ददात मिटली.

राजा कमलाराणी व तीन मुलांसह आनंदानें राज्य करूं लागला.

# खिलंदर जालंदर : : २

कांठोकाठ तांदुळानें भरलेला एक तांब्या एवढेंच काय ते जालंदरापाशीं माडवल होतें. नाहीं म्हणायला प्रवास करायला घोडा मात्र होता. जालंदर बेकार होता. उद्योगधंदा कुठें मिळेल हेंच त्याला कळत नव्हतें. तो घोड्यावरून निघाला.

एका खेडेगावीं कोणा बाईकडे तो उतरला. तिची चूल पेटलेली होती. तिचा स्वयंपाक चालू होता. रस्त्यालगत असलेल्या त्या बाईच्या घराच्या खिडकींतून जालंदरनें हें पाहिलें. त्यानें तिथेंच कांहीं काळ मुक्काम करण्याचें मनाशीं ठरविलें. लगेच घोडें झाडाला बांधून तो घरात शिरला.

"बाई, मी तांदुळानें भरलेला तांब्या देतों— माझा भात शिजवून देता का ? मी नदीवरून स्नानसंध्या करून येतों."

बाईनें जालंदरच्या म्हणण्याला रुकार दर्शविला.

जालंदर आंघोळीहून परत आला, तेव्हा ती बाई देवघरांत देवपूजा करीत बसली होती. ती तेथूनच जालंदरला म्हणाली,

"तुमचा भात तुमच्या तपेलींत शिजतो आहे; तो झाला कीं नाहीं बघा...उतरा...ताटांत वाढून घ्या...खा..."

जालंदर चुलीपाशीं गेला; त्याला बाईची लबाडी कळून आली. तांदूळ तांब्याभर होते.त्यात पाणी घालून भात शिजवायचा म्हणजे थोडे तरी तांदूळ कमी लागणार ! मग ते उरलेले तादूळ काय झाले ? का या बाईनें चोरले ?

तादूळ शिजत होते; भाताला कढ आला होता. रट् रट् रट् असा ताब्यांतून आवाज येत होता.

जालंदर आपल्याशींच जरा जोरानें म्हणाला,

" त्यात काय मोठंसं ! घेऊंदे हे त्या बाईनं तांदूळ घेतले तर. त्यांनीं भात नाहीं का शिजवून दिला ! "

देवपूजा करता करता बाईनें हे शब्द ऐकले. ती पलीकडच्या दालनातून म्हणाली,

" काय हो ! कुणाशीं बोलतां आहांत ? "

" काहीं नाहीं ! हा तांब्या बोलतो आहे. " जालंदर म्हणाला.

" काय म्हणतो तांब्या ? "

" तो सांगतो, कीं तुमचे तांदूळ या बाईनें घेतले. मीं त्याची समजूत काढली, घेऊं द्या. त्या बाईनीं आपल्याला आश्रय दिला...आपण भात शिजवला....करीना मूठभर तादूळाची अफरातफर ! "

बाई एकदम देवपूजा एकीकडे ठेवून म्हणाली,

" खरंच मीं तादूळ ठेवले त्यातले– देव माझ्यापुढं आहेत; खोटं कशाला उगीच बोलूं ? हा जादूचा तांब्या आहे ?... हा बोलतो ? '

" तर हो ! "

ती बाई उठून स्वयंपाकघरांत आली आणि म्हणाली,

" या तांब्याची किंमत सागा; मला तो विकत घ्यायचा आहे. "

" पांचशें रुपये पडतील... बघा जमत असेल तर. "

" अडीचशें द्या. "

" ठीक भाव." जालंदर म्हणाला. " या ताब्याचा फार उपयोग होतो मला.... तुम्हाला म्हणून देतों. "

" बरं ! माझी सावत्र मुलगी चोरटी आहे. तिला ' शाखांबरी ' गांवांत दिली आहे. आजच ती येणार आहे. कांहीं दिवसांनीं मंगळागौर करणार आम्ही. तिला कांहीं– कांहीं पण देणार नाहीं घालायला. माझ्या

मनांतनं तिला सासर वाईट मिळावं असं होतं; सासू सज्जन न् भोळी मिळाली हो. पण लेक चोरून खाते. तांब्या सांगेलच कांहीं चोरलं कीं... झोडपून काढीन टवळीला. ''

—जालंदर जेवला. त्या बाईनें तेवढ्या अवधींत परसांत जाऊन तुळशीवृंदावनाखालीं रुपया रुपया करून ठेवलेले पाचशे रुपये काढले.

तांब्याचा सौदा पटवून जालंदर झट्दिशीं घोड्यावर स्वार झाला. तो पुढील गावीं पोचेपर्यंत चागली संध्याकाळ टळली. रात्रीं वस्तीला कोठें राहावें याचा त्याला विचार पडला.

एका कलावंतिणीचा मोठा वाडा होता. तिनें गुराच्या गोठ्यांत घोडें बाधायला जालंदराला परवानगी दिली. तो गोठ्यातच निजला.

रात्रीं झोंपतांना त्यानें घोड्याच्या लिदींत एकेक रुपया घालून ठेवला होता.

सकाळीं कलावंतिणीची दासी सहज माडीवरून खालीं आली. तिच्या-देखत जालंदर लीद उपसून तिच्यातून रुपया काढीत होता.

" हें काय करतां तुम्ही ? " दासीनें आश्चर्यचकित होऊन विचारलें.

" आजची मिळकत ही ! रुपये काढतों– या माझ्या घोड्याच्या लिदींतून रुपये येतात. " जालंदर म्हणाला.

" अस्स ! " नवी बातमी सागायला कोणीही आतुर असते. दासी मोठ्या लगबगीनें पैसे देणाऱ्या घोड्याची हकीकत धनिणीला सांगायला गेली.

कलावंतिणीला पण सारा प्रकार पाहून अगदीं नवल वाटलें. तिला लोभ सुटला. रोज रुपये देणारा कामधेनूवजा घोडा तिला मिळाला तर हवाच होता.

पडेल ती किंमत देऊन तें जनावर घेण्याचा कलावंतिणीनें निश्चय केला.

प्रथम तिनें पांचशेंचा आकडा टाकला. हजार...दोन हजार...चार हजार...अशी हलके हलके रक्कम चढवली, तरी जालंदर हो म्हणेना.

तो म्हणाला,

" हा घोडा रोज रुपयांच्या राशी टाकील. आठदहा दिवसांत तरी निदान तुम्ही द्याल ते पैसे सहज तुम्हांला मिळतील....आतां दहा हजार रुपये मोजायला हरकत दिसत नाहीं. "

नाहीं होय करता करता कलावंतीण कबूल झाली. दहा हजार रुपये गाठीला मारून जालंदर निघाला.

त्यानें तें गाव ताबडतोब सोडलें. दोनतीन दिवस तो सारखा प्रवास करीत राहिला. पुढें एक गाव लागलें.

" हें कोणतें गांव ?' जालंदरनें एकापाशीं चौकशी केली.

" शाखाबरी नावाचं खेडं आहे हें. " त्याच्या प्रश्नाला उत्तर मिळालें.

त्याला एकदम आठवण झाली. ज्या बाईला त्यानें ताब्या विकला होता, तिची सावत्र लेक शाखाबरीलाच दिलेली होती.

त्या खेड्यात ब्राह्मणाचीं घरें दोनच होतीं; त्यापैकीं एका कुटुंबातील सूनबाई माहेरीं गेल्याची माहिती जालंदरला आसपास मिळाली.

जालंदरनें गर्दीनें घरात जाऊन विचारलें,

" आत कोण आहे ?... सूनबाईकडून मी आलों आहें... "

" मी एकटीच आहें; ते बाहेर गेले आहेत." घरमालकीण म्हणाली. " बसा; काय म्हणतात सूनबाई ? "

" अहो, मला पळभर थांबायला वेळ नाहीं. तुमच्या सुनेचा तिची सावत्र आई छळ करते आहे; येत्या मंगळवारीं तिची मंगळागौर आहे; सोन्याच्या डागाऐवजीं अंगावर डाग देईन म्हणते. तिला मंगळागौरीला घालायला दागिने नाहींत; ते तिनं ताबडतोब मागितले आहेत. घटकेचा खोळंबा खपणार नाहीं. तिचे असतील नसतील ते दागिने मला द्या. म्हणजे सावत्र आईचं नाक ठेचलं जाईल. आपण तिची अशी फजिती करूं ! काम झालं कीं डाग घेऊन मी शाखाबरीला परत येतों. "

घरच्या चार भिंतींपलीकडच्या व्यवहाराशीं फारसा संबंध येत नसल्यानें बायकांच्या स्वभावात भाबडेपणाचा थोडाबहुत अंश असतोच. त्या बाईनें मागचा पुढचा विचार न करता सुनेची वेळ साजरी व्हावी हा एकच हेतु मनात धरून दागिन्याचा डबा जालंदरापाशीं दिला.

घाईनें जायचें असल्यानें जालंदर क्षणभरसुद्धां तेथें थांबला नाहीं.

पण बाईचा नवरा आला. त्याला सगळा वृत्तान्त कळल्यावर तो संतापून बायकोला म्हणाला,

" शाबास ! हल्लीं सोनंनाणं नेणाऱ्या सोनेरी टोळया निघाल्या आहेत. हा खास कुणी लफंगा असावा. मला किंवा मुलाला विचारल्याखेरीज खूप कारभार केलात ! कुठच्या वाटेनं गेला तो ? "

" हा असा इकडे वळला. "

त्या बाईनें नवऱ्याला अंदाजानें रस्ता दाखवला.

—लांबवर आपल्या मागोमाग कोणी तरी येत असावें हा जालंदरला पक्का संशय आला. तो आणखी झपाट्यानें पुढें गेला व एका पिकानें दाटलेल्या शेतात शिरला. तेथें कुणी शेतकरी 'हर्र् हुर्र् हर्र् हुर्र्' करीत पाखरें हाकीत होता.

जालंदरानें विचारलें,

" हे काय करतो आहेस ? "

" श्यात राखतोंय् नव्ह का ! " शेतकरी म्हणाला. " अशी जिकिरीचं काम ! इकडं धावावं तिकडं पळावं..."

जालंदर बोलला,

" मी आजच्या दिवस तुझ्या बदली मोफत राखणदारी करतों. तें मुंडासं न् ती पैरण मला दे. माझे कपडे घालून तूं घरीं जा. "

शेतकरी चागले कपडे मिळत असल्यानें चटकन् आपल्या झो।डीवर जायला तयार झाला. जालंदरानें त्याची बोळवण केल्यावर एक खड्डा खणला, त्यात दागिन्याचा डबा ठेवून दिला व माती खड्ड्यांत लोटून वरती एक हारा पालथा झाकण घातला.

इतक्यात जालंदरचा पाठलाग करणारा माणूस तेथें आला. त्यानें पांखरे हाकणाराला विचारलें,

" काय हो ! इथून कुणी माणूस गेला का ? त्याच्या हातांत डबा होता का ? "

" हा ना ! हीं शाळूचीं उभीं ताटं हैती; त्यंच्यामधनं नीट जपूनशान जा. " राखणदार म्हणाला.

तो मनुष्य जोंधळयाच्या पिकांत घुसून दिसेनासा झाल्याबरोबर जालंदरानें हारा काढला; जमीन उकरली न् दागिन्यांचा डबा घेऊन विरुद्ध दिशेनें प्रयाण केलें.

शाखावरीहून शक्य तितकें दूर जाण्याकरितां जालंदरानें एक घोडी विकत घेतली.

घोडदौड चालू असतां मध्येंच कांहीं कारणानें त्यानें घोडीची गति मंद केली.

एक म्हातारी झपाझप रस्त्यानें चालली होती न् तिच्याबरोबर चालणारी तरुण मुलगी अगदीं दमलेली दिसत होती.

त्या सुंदर मुलीकडे बघत जालंदरनें म्हातारीला विचारलें,

" काय आजीबाई ! कुठं निघालांत ? "

" अजून मायंदळ जायचंय् बाबा; एवढ्यानं काय झालंय, ? मला पायपिटीची संवय आहे. पण ही नाजुक साजुक पोर ! माझी नात– हिचे पाय थकले आहेत ! "

जालंदर म्हणाला, " मी तुमच्या नातीला घोडीवर बसवतों न् मी हळू हळू तुमच्याबरोबर घोडी चालवतों; जाऊं आपण गप्पा मारीत. "

" लई गुणी बाबा तूं ! नांव काय तुझं ? " म्हातारीनें विचारलें.

" मला म्हणतात नातजांवई ! मग घोडीवर घेऊं मुलीला ? "

म्हातारीनें नातीला रिकिबींत पाय ठेवून घोडीवर चढायला सांगितलें.

जालंदरानें ती तरुण मुलगी त्याच्यामागें त्याला बिलगून बसतांच घोडीला जोरानें टांच मारली.

म्हातारी आरडाओरड करूं लागली. ती ऊर बडवून रडत बोलली,

" माझ्या नातीला पळवलं हो– पकडा त्या भामट्याला– धांवा धांवा– ! "

मार्गानें जाणारे कांहीं वाटसरू म्हातारीभोंवतीं जमले. प्रत्येकानें पहिला प्रश्न केला,

" कोण मनुष्य आहे तो घोडेस्वार ? "

" तो नातजावई ! धरा हो त्याला. जा जा– माझ्या नातीला सोडवा ! "

वाटसरू हंसायला लागले. तशी म्हातारी किंचाळली,

" थट्टा काय करतां ! माझ्या नातीला पळवलं मेल्यानं ! "

वाटसरूंतला एकजण हंसू दाबण्याचा यत्न करीत म्हणाला,

" आजीबाई, नातजांवयानं नातीला पळवून नेलं यांत बिघडलं कुठं ? नवऱ्यानं स्वतःच्या लग्नाच्या बायकोला म्हणे पळवून नेलं; काय भाषा ! तरणा नवरा सोडून तुमच्यापाशीं राहायचं हो तिनं ! "

लोकांना समजून सांगतां सांगतां आजीबाईच्या तोंडाला चिकटा आला. त्यांची त्रेधातिरपिट उडाली. नातजांवई केव्हांच दिसेनासा झाला होता.

जालंदर परमुलखांत एका मोठ्या गांवीं गेला. बरोबर आणलेल्या मुलीशीं त्यानें थाटानें लग्न केलें.

बायकोचे नवे दागिने तयार झाल्यावर त्यानें 'शाखांबरी'चा डागांचा डबा परत केला—

जालंदर चैनींत राहूं लागला.

# "असल तें कमअस्सल" ३

एक होता राजा. त्याला दोन बायका होत्या. थोरली होती नावडती न् धाकटी होती आवडती. नावडतीला एक मुलगा व आवडत्या राणीला तीन मुलगे होते.

नावडतीचा लेक सर्वांत मोठा ! तो राज्याचा वारस होणार हें आवडत्या राणीला खपलें नाहीं— तिनें एक दिवस राजाला म्हटलें,

" आपण परीक्षा घ्या न् शहाण्या मुलाला राज्य द्या. "

" कशी पारख करायची हुषारपणाची ?" राजानें विचारलें.

राणी बोलली,

" 'अस्सल तें कमअस्सल, कमअस्सल तें अस्सल. गादीके गद्धा न् बाजारके कुत्ता...' हीं वाक्यें जो खरीं करून दाखवील त्यास राज्यपद द्यावं. "

राजानें हें कबूल केलें.

आपल्या चारहि मुलांना बोलावून त्यानें हा पण सांगितला न् त्यांना कामगिरीवर जाण्याची आज्ञा केली.

—निघतांना प्रत्येक मुलाला राजानें खर्चासाठीं अकराशें रुपये दिले होते. मुलांना कर्तबगारी दाखवायला सहा महिनेपर्यंत वाव होता.

—नावडत्या राणीच्या मुलाचें लग्न झालेलें होतें. तिच्या सवतीनें ही सून निवडली होती. तिचें राजपुत्रावर मुळींच प्रेम नव्हतें.

सावत्र आईच्या– आवडत्या राणीच्या– आग्रहावरून थोरला राजपुत्र बायकोला सागातीं घेऊन पण पुरा करण्यास निघाला.

त्याचे सावत्र भाऊहि वेगवेगळया दिशांना गेले.

'अस्सल तें कम कस्सल– कमअस्सल तें अस्सल; गादीके गद्धा बाजारके कुत्ता' हे शब्द वस्तुस्थितींत दाखवून देणें आवडतीच्या मुलाना साधले नाहीं. मिळालेले अकराशे रुपये चैनींत उधळून ते राजवाड्यांत परत आले.

धाकट्या राणीला हायसें वाटलें. तिचा सावत्र मुलगा धाडशी होता. तो या धादलींत जिवाचा अंतसुद्धा करून घेईल अशी तिची जवळ जवळ खात्री होती. तीच कल्पना तिच्या मनाला सुखवीत होती. ती आपल्या-शींच कितीदा तरी म्हणाली,

" त्याची बायकोहि त्याच्या यत्नात अडथळे आणायला आहे... आता आपल्या मुलाचा गादीचा मार्ग अगदीं निर्वेध झाला. "

बिचारी नावडती राणी मुलाच्या काळजीनें वाळून चालली होती— मुलगा सावत्र आईचें मन मोडायचें नाहीं म्हणून बायकोला घेऊन गेला. तिचा नवऱ्यावर जीव नाहीं हें सर्व तिला ठाऊक होते.

—मुलाच्या होत असलेल्या हालाचीं कल्पनाचित्रें नावडत्या राणीला यमयातनाचा अनुभव देऊं लागलीं.

ठरलेली मुदत टळते केव्हा न् लेकाला पुन्हा बघतें केव्हा असें तिला झालें होतें.

* * * *

थोरला राजपुत्र भटकतां भटकतां नजीकच्या एका राज्यात गेला. राजधानीबाहेर त्यानें बंगला भाड्यानें घेतला व तिथें तो सहकुटुंब राहूं लागला.

तिथल्या राजाच्या मुलाची व त्याची शिकारीच्या निमित्तानें ओळख झाली. या ओळखीचें रूपान्तर दाट मैत्रींत व्हायला वेळ लागला नाहीं.

बायको घरांत नीट वागत नसल्यानें राजधानींत एका कळवंतिणीकडे थोरला राजपुत्र वरचेवर जात असे. कळवंतिणीच्या मुलीचें त्याच्यावर निस्सीम प्रेम बसलें. थोरला राजपुत्र तिथें पत्ते खेळे, गंजिफा खेळे–त्याचा दिवसाकाठीं पुष्कळ वेळ त्या ठिकाणीं जात असे.

—अट पुरी करण्यास देण्यांत आलेला सहा महिन्याचा काळ बहुतेक संपत आला होता.

—याची जाणीव होताच त्या दिशेनें खटपट करायचें थोरल्या राजपुत्रानें ठरवलें.

—एक दिवस त्यानें आपल्या दोस्ताना, राजाच्या मुलांना विचारलं,

" गड्याहो, माझं काहीं काम कराल का ? "

" कोणतं ? " राजाच्या दोन मुलांपैकीं एकानें उत्सुकतेनें विचारलें.

" फार त्रासाचं नाहीं. सकाळींच राजवाड्यांतून बाहेर पडायचं, जेवायच्या वेळेला येतों म्हणून सांगायचं पण दिवेलागणीनंतर परत यायचं. "

" हो– हो. आम्ही शिकारीला जाऊं. "

" खरंच ! मला नाहीं वाटत तुम्ही बापाशीं लबाडीची भाषा वापरायास तयार व्हाल. "

" हात् तुझी... तेवढ्यानं तुझं कांहीं काम साधत असलं तर त्यात रे काय ! उद्यांच गंमत करतों कीं नाहीं बघ आम्ही. " राजपुत्रांकडून उत्साहाचा जबाब मिळाला आणि दुसऱ्या दिवशीं सकाळचेच ते राजवाड्यांतून निघाले. जाताना 'दुपारचे आम्ही माघारीं येतोंच' असा निरोप त्यांनीं राजाचे कानावर घालण्याची व्यवस्था केली होती.

—वाटेंत मित्राच्या बंगल्यावर ते गेले. तिथें राहणारा दुसऱ्या देशचा थोरला राजपुत्र बायकोदेखतच त्यांच्या संगतीनें बाहेर पडला. मागाहून तो परत आला. येतांना त्यानें दोन मुंडकीं झोळींत आणलीं होतीं.

बायकोला तो म्हणाला,

" त्या राजाच्या पोरांना मीं मारलं– त्यांचीं डोकीं या झोळीमधें आहेत. तीं पेटींत मी ठेवतों...कुणाला हें सांगू मात्र नको. "

अर्थात् हें बजावतांना आपली बायको नक्की सारें रहस्य उघडें करणार ही त्याची खात्रीच होती.

शेवटीं तसेंच झालें.

जेवणाची वेळ टळून प्रहर लोटला तरी मुलें येईनात तशी राजा फिकिरींत पडला. त्यानें राजदूत जिकडे तिकडे मुलांच्या शोधार्थ पाठवले.

यातलेच काहींजण अन्य देशच्या राजपुत्राच्या बंगल्यात तपासासाटीं गेले.

चौकशी करतां त्या राजपुत्राची पत्नी म्हणाली,

" सकाळीं राजाचीं मुलं इथं होतीं. त्याना यानीं ठार मारलं... मुलांचीं मुंडकीं त्यानीं झोळींत घालून पेटींत टाकलीं आहेत...!"

राजदूताना मग बंगल्याच्या आवारात रक्त ठिबकलेलें एकदोन ठिकाणीं आढळल्याचें स्मरण झालें.

त्यानीं झोळी ताब्यात घेतली. तींतून रक्त गळतच होतें. राजदूतानीं खुनाची वर्दी देताना झोळी जशीच्या तशी राजापुढें हजर केली.

राजानें चिडून आपल्या मुलाच्या त्या सवंगड्याला सुळीं देण्याची शिक्षा फर्मावली. गुन्हेगाराची शोधाशोध सुरू झाली. तो कलावंतिणीच्या मुलीशीं पत्ते खेळण्यात गढला असतां राजाचे नोकर त्याला घेऊन गेले.

राजानें विचारलें,

" तूं माझ्या मुलांची हत्या केलीस ? "

दुसऱ्या देशचा राजपुत्र बोलला, "हो...तो घोर अपराध घडला खरा माझ्या हातून..."

—आणि हीं वाक्यें उच्चारतांना त्याला हंसूंच यायला लागलें.

" आणखी हंसतोस वर ? निर्लज्जा ! जा. याला सुळीं द्या. याची धिंड काढा गाढवावरून." राजानें खवळून आज्ञा फर्मावली.

मुख्य मुख्य रस्त्यावरून गुन्हेगाराची धिंड निघाली.

यांतल्याच एका रस्त्यावर कळवंतिणीचें घर होतें. तिची लेक धांवत आली न् म्हणाली,

" मला पण गाढवावर बसवा न् मिरवा...त्यांना शिक्षा द्याल ती मला द्या. "

अगदीं हटूनच बसल्यामुळें तिलाही गाढवावर चढवण्यांत आलें. खुद्द राजपुत्राच्या पत्नीला जरी ही दुःखद बातमी कळली होती तरी तिला त्यानें काहींच द्रव फुटला नाहीं. गुप्त गोष्ट फोडण्याचा आपला अपराध नवऱ्याला समजला असणारच. त्याच्या नजरेसमोर आता जाणें नको असेंच तिला वाटत होतें.

—शिक्षेची अंमलबजावणी होत असताना तिन्हीसांजा झाल्या– दिवेलागण झाली–आणि ज्याच्या वधामुळें सुळीं जाण्याचें प्रकरण राजधानींत उद्भवलें तें साऱ्या अनर्थाचें मूळ असे राजपुत्रच रानातून परत आले.

—सगळ्याच्या तोंडून आश्चर्योद्गार निघाले.

राजानें मुंडकीं असलेली रक्तानें माखलेली झोळी आता बघितली. कापडात बोकडाचीं दोन तोंडें होतीं. पिशवींत न पाहताना राजदूताच्या म्हणण्यावर भिस्त ठेवून वागणारा राजा मनात चागलाच वरमला. तो म्हणाला,

“ मी अपराधी आहें...मीं न्याय नीट निवडला नाहीं. ”

त्यानें आपल्या मुलाच्या मित्राची मोकळ्या मनानें माफी मागितली.

दुसऱ्या देशचा राजपुत्र म्हणाला, “ आता तुम्ही, ही नायकिणीची पोर, माझी बायको, तुमचे नोकर आपण सर्वजण आमच्या राज्यात माझ्या वडलाच्याकडे जाऊं. तुमची मला फार गरज आहे. याल का ? ”

“ अवश्य, ” राजा म्हणाला, “ अशानं मीं केलेल्या अन्यायाचं थोडं तरी परिमार्जन होईल. माझ्या अंतःकरणाला तेवढंच समाधान ”

–सगळा लवाजमा थोरल्या राजपुत्रासहित योग्य स्थळीं पोचला. –तो सहा महिन्याच्या मुदतीचा शेवटचा दिवस होता.

थोरला राजपुत्र बरोबरच्या सर्वजणाना घेऊन बापाला भेटला. दोघा राजांनीं एकमेकांचें कुशल विचारलें.

औपचारिक बोलणीं संपताच थोरला राजपुत्र बापास एकंदर हकीकत सांगून म्हणाला,

“ ही माझी बायको...माझ्याशीं हिनं विश्वासघात केला...पेटींतली झोळी हिनें दाखवली...माझी सुळीं जायची वेळ आली तरी हिला धम्म नाहीं...अस्सल तें कम्‌अस्सल. उलट ही कळवंतिणीची पोर...

माझ्याकरतां जीव द्यायला तयार झाली. कमअस्सल तें अस्सल...हा राजा..."

थोरला राजपुत्र सर्वेच त्याच्याकडे वळून बोलला,

" महाराज, रागावूं नका. वचनपूर्तीसाठीं मी हें बोलतों आहें."

नंतर बापास राजपुत्र म्हणाला, " हा राजा गादीके गद्धा...यानें न्यायदान करतांना गुन्ह्याचा खरा खल केला नाहीं, अन् हे राजदूत बाजारचे कुत्रे...भाडोत्री...मालकाची सेवा कळकळीनं बजावण्याची निष्ठा नाहीं...तसे असते तर पिशवींत मुंडकीं कोणाचीं आहेत तें पाहाण्याची तसदी यांनीं घेतली असती."

राजाचें पूर्ण समाधान झालें. त्यानें थोरल्या राजपुत्रास सबंध राज्य आपल्यामागें देऊं केलें. तोच एकटा वारस ठरला.

कळवंतिणीच्या मुलीला थोरल्या राजपुत्रानें कायमचा आश्रय दिला. कमअस्सल अंगच्या गुणानीं अस्सलाच्या पदवीला पोंचलें.

—नावडती राणी राजाची पट्टराणी झाली– आवडत्या राणीवरची त्याची मर्जी उडाली.

---

# ऊन्ह धरणारी कायको : ४

" एक विचारूं का ? "

" विचार. "

" मामंजी आज दुपारीं जेवायला बसले होते, सासूबाई वाढीत होत्या, खिडकींतून उन्हाची तिरीप आली ती प्रथम मामंजींच्या अगदीं जवळ भिंतीवर होती. मामंजींच्या अंगावर उन्हाचीं किरणं जरा वेळानं पडलीं. असं व्हायचा अवकाश, लगेच सासूबाई खिडकीच्या न् मामंजींच्या मधोमध उभ्या राहिल्या त्याना उन्हाची झळ लागूं नये म्हणून. मी माजघरांत होतें, सहजानुसार सारा प्रकार माझ्या नजरेला पडला. मामंजी मोठ्यानें हंसले. "

" मग ! त्यांत एवढं काय झालं ? हंसले असतील एरवींच ! " तो म्हणाला.

—तिला आज कसली तरी चुटपुट लागून राहिली होती. संध्याकाळच्या सुमाराला नवरा घरात, मामंजी दुकानांत, सासूबाई किरकोळ कामधाम तिजवर टाकून देवदर्शनाला गेलेल्या. ही संधि तिनें साधली. दिवसभरच्या घरप्रपंचाचीं बोलणीं चाललीं असतां तिनें नवऱ्याला तिला

विशेष वाटलेला दुपारच्या जेवणाच्या वेळचा प्रसंग सांगितला. सर्व कांहीं ऐकून नवरा पत्नीला बोलला,

" त्याला मुळींच महत्त्व नाहीं. मनुष्य काहींतरी विचार मनांत येऊन पुष्कळदा हंसतो. बाबा का हंसले हें मीं कसं ओळखणार ? "

" पण ते तुमच्या आईलाच उद्देशून हंसले असावेत. कारण सासूबाई ओशाळल्यासारख्या झालेल्या पाहिल्या मीं किंचित्. "

" ग्रा ! बरंच निरीक्षण केलंस तूं ! "

'' अशी उडवाउडवी नको गडे ! सांगा ना का हंसले मामंजी तें ! '' त्याची बायको हेकाच धरून बसली.

" बरं ऐक." खूपसे आढेवेढे घेतल्यानंतर तिचा पति म्हणाला, " मी तुला एक गोष्ट सांगतों.

' पूर्वी या शहरात सत्यव्रत नावाचे एक गृहस्थ राहत होते. ते श्रीमंत होते. व्यापारात त्यानीं चांगला पैका कमावला होता. धनधान्य विपुल घरात होतं. लक्ष्मी वैभवानं त्याच्याइथं तळपत होती.

' सत्यव्रताची सासुरवाडी पण तोडीला तोड होती. सासुरवाडचीं राहण्यासाठीं त्याना नित्य बोलावणीं येत. ते सासुरवाडीला गेले कीं त्याची कोण बडदास्त होई ! घरीं त्याना कुणी विसंबत नसत. खायला प्यायला नाना तऱ्हेचं मिळे. वाड्यापासून कोंपऱ्यापोतर जायचं असलं, तरी व्याह्याची घोडागाडी सज्ज असे. सासू, सासरा, मेहुणे त्याच्या पुढं पुढं करीत. त्याना राहायचा सपाटून आग्रह होई. सत्यव्रतांना करमेनासं झालं कीं त्याचा गप्पाटप्पांत वेळ जावा याकरतां गांवातले बहुबोल, गोष्टीवेल्हाळ लोक मुद्दाम बोलावून आणले जात. पानाचं तबक, त्यात अवश्य तें साहित्य- तस्त, सदैव सत्यव्रतांच्या पुढ्यांत असेच. धन्य धन्य होई सत्यव्रतांना अशी सासुरवाडी मिळाल्याबद्दल.

' वर्षातून दोनतीनदा तरी सत्यव्रत सासऱ्याच्या गांवीं जात. आजोळच्या आदरातिथ्याचा, हरएक बाबतींत प्रेमानं लळा लावून वागण्याचा सत्यव्रताच्या मुलाला चांगलाच अनुभव आहे.

‘ सगळे दिवस सारखे नसतात. व्यापारात चलती नेहमीच असते असं नाहीं. व्यापारउदीमात सोळा बारा चालणारच.

‘ सत्यव्रतानीं धंद्यात जबर ठोकर खाल्ली. हा धक्का असा तसा नव्हता. घर गहाण पडलं, चीजवस्त विकावी लागली. मुलगा लहान होता. त्याच्या शिक्षणाचं आजोळच्या मार्फत जमवावं असं सत्यव्रताच्या मनात होतं. त्या गावीं जाणाऱ्या एकाच्या हातीं त्यानीं तसा कागद लावला परंतु त्याच उत्तर नाहीं. सत्यव्रत मग त्या फंदात पडले नाहींत. त्याच्या एका दूरच्या नातलगाकडे त्यानीं चिरंजीवाना पाठवलं. त्या नातेवाइकानं आनंदानं त्या बेताला रुकार दर्शवला तेव्हा किती उपकार वाटले सत्यव्रताना ! गावात राहण्यामध्ये अर्थ नव्हता, स्वतःचं घर दुसऱ्याच्या मालकीचं होणार ही परिस्थिति. तिथं दिवस काढणं कठीण कर्म होतं. शिवाय त्या पडत्या काळात सत्यव्रताची पत्नी त्याना कुजक बोलून बोचायचीसारखी दुखवायची.

‘ सासऱ्याकडून नेहमींप्रमाणं बोलावणं येईल नि आपण जाऊं या भरंवशावर सत्यव्रत होते; परंतु पूर्वीं सासरचं कुणी ना कुणी कुशल विचारण्यासाठीं सतत येत-जात. आता मात्र बायकोच्या माहेरचं चिटपांखरूं फिरकेना.

‘ अशा स्थितींत त्यानींच सहकुटुंब सासुरवाडीला प्रयाण केलं.

‘ त्याची अटकळ ही कीं काहीं अडचणीमुळं सासुरवाडच्या माणसाना पत्र पाठवण्यास अगर समाचारार्थ मनुष्य धाडण्यास फावल नसावं.

‘—आपल्या माणसाची पारख आपत्कालात करता येते. सुखाचे सोबती सगळेच असतात. संकटात सावली देतील, आपली दमसाड होऊं नये, धैर्य खचूं नये, आपल्या उमेदी कायम राहाव्या याकरता झटून साहाय्य करतील तीं खरोखरचीं आपलीं माणसं ! श्रीमंतींत पंक्तीला जेवणारे जर दुःखकालात दंतपंक्ति काढून उपहास करायला लागले तर त्यांना आपलं कस म्हणायचं ?

‘ सत्यव्रताची खात्री होती कीं हलाखींत आपणाला सासूसासऱ्याकडून उत्साहाचा शब्द मिळेल. या समजुतीच्या बळावर ते व्यापारात झालेले

आघात धैर्यानं सोशीत होते. बायको मधून मधून हृदयातल्या जखमेवर मीठ चोळीत होती तरी सत्यव्रतांचा शांतपणा रतिमात्र ढळला नाहीं.

' तथापि त्याना सासरच्या माणसात मागच्याइतकी आस्था आढळली नाहीं– वाड्यात शिरताना त्याना हंसतमुखानं कोणी सामोर गेलं नाहीं, त्याना बसायला दिवाणखान्यात कुणीं बोलावलं नाहीं, नोकरमाणसं त्याच्या आसपास झुलताहेत हें जुनं दृश्य निराळ्या अर्थानं त्याच्या प्रचीतीला आलं; गड्यातच त्याची ऊठबस व्हायला लागली; इतर गडी-माणसांचीं कामं त्याना सांगण्यात येत; सासऱ्यानं सत्यव्रत गेल्यावर पदरचा एक मोलमजुरी करणारा काढून टाकला !

' बायको स्वयंपाकघर माजघरातून, नातलगांच्या घोळक्यातून, क्वचितच वेगळी वावरे. भावजयांबरोबर आली-गेली तर सत्यव्रतांच्या देखता त्याच्यापुढून जायची; पण त्याच्याशीं ती बोलत नसे– अवाक्षरानं देखील त्याची पूसतपास घेत नसे.

' चोवीस तास ते पुढल्या सोप्यास, पडवींत, ओट्यावर असे असत. तेथेच ते रात्रीं झोपत.

' थंडी होती तेव्हा. पहाटे गार वारा येई. गारठा सपाटून सुटे सत्य-व्रताना तुटपुंजीं पांघरुणं दिलीं होतीं. रात्रीं ओसरींत दिवा नसे. एका काळीं त्याच्याशीं अदबीनं वागणारे मेहुण-सासरे अंधारात त्याना खुशाल तुडवून पुढं जात. हे ध्यानात येऊन सुद्धा त्यानीं खेद दाखवला असं, कधींच घडलं नाहीं.

' सत्यव्रताच्या जेवणखाणाची चौकशी होत नसे; उरलेल्या अन्नाचे ते वाटेकरी असत. दरवाजाबाहेर भिकाऱ्याला जे शिळंपिटकं अन्न वाढायचं तें दारापाशींच ओसरीवर असलेल्या सत्यव्रताच्या पानांत टाकलं जाई.

' पोरासोराच्या ते चेष्टेचा विषय झाले होते.

' सारींजणं त्याना तुच्छ तुच्छ करीत.

' हा दाह किती सोसणार ? अगदीं सहन न होण्याजोगा हा अपमान होता. जिथं फुलं वेचलीं तिथं गोवऱ्या वेंचायची पाळी सत्यव्रतांवर आलेली होती. सासू-सासरे, मेहुणे यांच्या बोल-प्रहारानीं त्याचा जीव वैतागला.

अगणित सुयानीं विद्ध झाल्यासारखी त्याच्या अंतःकरणाची अवस्था बनली होती.

' अखेरीस सत्यव्रताचा निश्चय झाला. त्यानीं ठाम ठरवलं कीं बाहेरल्या जगात कुठंही हमाली करायची न् स्वाभिमानानं काळ कंठायचा.

' याच विचाराचं प्राबल्य मनांत असता सत्यव्रतानीं आपल्या सासऱ्यांना एक दिवशीं म्हटलें,

'' उद्या सकाळीं मीं बायकोला घेऊन निघतों. '

'' पहाटेच जावं हे उत्तम ! ' सासरा स्वतःचा सल्ला बोलला नि आपल्या उद्गाराचं समर्थन करीत आणखी म्हणाला, ' पायीं जाणार तुम्ही, सकाळींच उन्ह येऊं लागेल न् लवकरच त्याचा त्रास होईल. उजाडण्याअगोदरच्या प्रवासानं उन्हाच्या वेळेपर्यंत लांबचा पल्ला गाठता येईल. '

' मेहुण्यानींहि जावईबुवाच्या निघण्याच्या भाषेचं प्रेमानं स्वागत केलं. प्रथमच खुलावट चर्येनं ते आपल्या मेहुण्याशीं बोलले.

' सत्यव्रताच्या बायकोच्या मनात माहेर सोडायचं नव्हतं; पण पति कर्तव्यबुद्धीनं तिला घेऊन जातो म्हणाला ! तिचा इलाज नव्हता. ती अतिशय चडफडली. परंतु तिला नवऱ्याबरोबर निघणंच भाग पडलं.

' दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे—

' सासऱ्यानीं ओसरीवर निजलेल्या जावयाला गदगदा हलवलं. ' जायचंय् ना ? आवरा, उशीर होईल. ' असें बोलतच त्यानीं सत्यव्रताना बसतं केलं न् मग ते स्वतःच्या पथारीवर जाऊन पुन्हां झोंपले.

' सत्यव्रत उठले. बायकोला त्यानीं जागं केलं. ती हलतच नव्हती. अळंबळं निघायला ती तयार झाली.

' तेवढ्यात सासरे इकडून गरजले,

'' अहो, आता कुणाला ताप देऊं नका. निजलेल्याच्या झोंपा मोडूं नका. त्या स्वयंपाकघरातल्या शिंक्यात परवाच्या भाकरी आहेत. त्या घेऊन चला लौकर... '

' सत्यव्रतांच्या सासूबाई उठल्याच नाहींत. बायको ताठरलेली होती. सत्यव्रतानींच भाकऱ्या शोधल्या.

"'तांब्या घे ग पाण्याला.' ते बायकोला म्हणाले.

"'कुठला घेऊं! आपलं सत्तेचं घर समजतां का काय हें?' त्याची पत्नी कुरकुरली.

'जावई का घोटाळत आहे हें सासऱ्याला वरील संवादाच्या संदर्भानं कळलं. तांब्या परतीच्या बोलीनं त्यानं न्यायला सांगितला.

'सत्यव्रत बाहेर पडल्यावर सासऱ्याचे स्पष्ट उद्गार त्याच्या कानावर आले,

"'गळू फुटल्यागत कसं हलकं वाटतंय!'

'त्या गावापलीकडे बरंच लांब तीं दोघं गेलीं. वाटेत त्याना विहीर लागली.

"'इथंच भाकरी खाऊं आपण...विहिरीचं पाणी आहे अनायासं.' गौरी– सत्यव्रताची बायको– त्याना म्हणाली,

"'नको ग. अजून कोवळंच ऊन आहे. सूर्य वर येऊं दे. पुढंही नदी नाहीं तर झरा भेटेल. तितकंच चालणं होईल!'

"'नाहीं. मला या इथं भाकरी खायची; तुम्ही तरफडत जा वाटलं तर उन्हातान्हात!' गौरी संतापानं म्हणाली.

"'बरं. थांबूं.' सत्यव्रत नमतं घेत उद्गारले. 'पण पाणी कसं काढणार?'

"'तांब्या आहे ना हा? डोसकीचं पागोटं काढा, त्याचं फडकं तांब्याच्या गळ्याला गुंडाळा न् तो विहिरींत सोडा.'

'अन् सत्यव्रत वाकून पाणी काढीत असतां—

'त्याना पुरत्या कंटाळलेल्या, माहेरीं जायला अधीर झालेल्या, तिथल्या छानछोकी आयुष्यात सुख मानणाऱ्या, गौरीनं त्याना जोरानं विहिरींत ढकललें!

'तिनं पुढचामागचा विचार केला नाहीं. सत्यव्रत, त्यांचं पागोटं, पाण्याचा तांब्या याविषयीं कसलीच काळजी बाळगली नाहीं. आरोपांत सापडूं नये म्हणून गौरीनें लगबगीनं माहेरची वाट धरली. जाताना भाकरी तिनं कुत्र्यांना खाऊं घातल्या.

'घरीं जातांक्षणीं ती बापाला म्हणाली,

'' चांगली स्थिति आल्यावर मला ते बोलवणार आहेत. त्यांच्याबरोबर माझे– तुमच्यासारख्या बड्या इसमाच्या लेकीचे– हाल नकोत यासाठीं त्यानीं मला माघारीं पाठवलं.'

' तिचा बाप मध्येंच पुटपुटला, ' बरं झालं. पिडा गेली. बायकोला संभाळायची अक्कल नाहीं; पुढचं चरित्र अगोदर कळलं असतं तर या राजश्रींना मुलगीच दिली नसती ! '

' इकडे विहिरीमध्ये पडलेले सत्यव्रत पोहत एका कपारीला लागले. विहिरीच्या कडेच्या पाण्यात बुडलेल्या लहानशा खडकाच्या आधारानं ते बसून राहिले.

' लमाणाचा तांडा मुक्काम दरमुक्काम करीत चालला होता. लमाण रात्रीचे वस्तीला त्या विहिरीपाशीं थाबले.

' त्याच्यातला एक मनुष्य पाणी आणायला गेला त्या वेळीं ' मला वर काढा हो ' ही दीनवाणीनं सत्यव्रतानीं मारलेली हांक त्यानं ऐकली. त्याची कल्पना झाली कीं विहिरींत भूत आहे. पाणीबिणी घेणं राहिलं बाजूला ! तो तसाच तिथून पळत आपल्या वस्तींत आला.

' रात्रभर विहिरीकडे कोणी ढुंकलं नाहीं. सत्यव्रत जीव न् खडक धरून बसले होते– थेट रात्र संपेपर्यंत गार गार पाण्यात थंडींत कुडकुडत !

' उजाडताना पाण्याची नडच भयंकर भासली तेव्हा लमाणातले पाच सहाजण दोर पोहरा घेऊन विहिरीनजीक दबकत दबकत आले.

'' मी भूतबीत नाहीं, गरीब माणूस विहिरींत पडलों, मला वरती घ्या. ' सत्यव्रत आर्त स्वरानं ओरडले. जगण्याची ती अखेरचीच धडपड होती त्यांची.

' लमाणातल्या काहीं जणानीं माणसाचा शब्द ओळखला. खोल भयाण विहिरीमध्यें शोधक नजरेनं बघितलं. त्याना कपारीला चिमणीएवढं तोंड करून बसलेली मनुष्याची आकृति दिसली. त्यानीं त्या दिशेला दोर फेंकला.

' सत्यव्रत वरती आले.

' त्याना हुडहुडी भरली होती. हिंवताप आलेला होता. व्यापाऱ्यांनीं त्यांना दवापाणी केलं.

' प्रकृति नीट झाल्यानंतर सत्यव्रत म्हणाले,

" ' मी कुठंही चाकरी करणारच; मला धंद्यांतली माहिती आहे. तुम्हीही व्यापारी आहात. माझा उपयोग झाला तर पाहा. '

' व्यापाऱ्यांना माहितगार माणसाची हिशेबठिशेब ठेवायला गरज होतीच. त्यानीं सत्यव्रतांना हवा असलेला रोजगार दिला.

' त्या सालीं लमाणातल्या व्यापाऱ्याना सत्यव्रताच्या सचोटीच्या न् नेकीच्या नोकरीमुळं लाखों रुपये फायदा झाला. हाताखालीं विश्वासू मनुष्य नसल्यानं कसं नुकसान होतं याचा त्यांना सत्यव्रतावरून नवीनच अनुभव आला.

' या किफायतीनं व्यापारी गबर झाले होते. त्याच जन्माचं कल्याण झालं होतं. सत्यव्रताच्या कामाची जाणीव ठेवून त्यांनीं आपसात कांहीं टरवलं आणि त्याच्यातला एकजण त्याना म्हणाला,

" ' आम्ही तुला पंधरा हजार रुपये बिनव्याजीं देतों. गांवीं जा, धंदा कर, इभ्रत परत मिळव. सावकाश पैसे फेड. '

' सत्यव्रत पुन्हा आपल्या गावात आले. त्यानीं जमीन-घर सावकारापासून सोडवलं. धंद्यात हळू हळू चागल्यापैकीं जम बसवला.

' सत्यव्रतानीं आपल्या मुलाला नातलगाजवळून आणलं. त्या आप्ताचे अलोट उपकार त्यानीं पैशाच्या रूपानं फेडले.

' पुरेसा पैसा गाठीला साठला. कुठलं पाव आणा देणं राहिलं नाहीं. घरसंसाराच्या सर्व सुखसोयी पहिल्याप्रमाणं घरात आल्या. चंचल लक्ष्मी घरामधें दिमाखानं, डौलानं वावरायला लागली.

'—मग सत्यव्रतानीं गौरीला आणायला आपला गुमास्ता धाडला.

' त्यानं सत्यव्रताचं वैभव सासुरवाडीला सांगितल्यानं सासऱ्याकडून फिरून अजीजीचं, अत्यंत सन्मानपूर्वक त्याना आमंत्रण आलं.

' सत्यव्रत सासुरवाडीला थाटामाटान गेले. पण तिथं ते राहिले नाहींत. पाहुणचाराचा त्यांनीं लाभ घेतला नाहीं. व्यापारधंद्याचं नुकसान होतं या सबबीवर गौरीला घेऊन ते लागलींच परत निघाले.

' फारच जुनी हकीगत ही. नंतर त्याच्या मुलाचं लग्न झालं. गौरी सत्यव्रताच्या अर्ध्या वचनांत असते. त्यांच्यापुढं झेलूं झेलूं करते. '

" हो, पण मला ही गोष्ट कां सांगतां ? " पत्नीनें विचारलें.

" अग, गोष्टींतला सत्यव्रत म्हणजेच माझे बाबा आणि गौरी ही आई ! " तो हंसून म्हणाला. पुढें तो बोलला,

" बाबा स्वभावानं सज्जन म्हणूनच झाल्या-गेल्या गोष्टींची ते आईला ओळख देत नाहींत. मला घडामोडी तुटक माहीत होत्या. बाबाना आड-पडद्यानं प्रश्न विचारून, मध्यन्तरीं आजोळी गेलों तेव्हां झालेल्या संभाषणा-वरून मीं एकंदर वृत्तान्त ठाऊक करून घेतला. आज आईनं ऊन आडवलं, बाबाच्या अंगावर उन्हाचा कवडसा पडूं नये म्हणून ती मधें उभी राहिली न् बाबांच्या मनांत ठळकपणें मागचा इतिहास उभा राहिला. ते हंसले."

इतकें सांगितल्यानंतर नवरा थट्टेच्या सुरांत बायकोला म्हणाला,

" तूं अशी वागशील का सासूसारखी ? पैसा असला, पंचपक्वान्नांचं ताट– नाहीं तर ताटी ! "

" इश्श ! मी नाहीं हो तसली ! "

" वेळ आली म्हणजे परीक्षा..."

त्याचें वाक्य अर्धवट राहिलें.

" तुम्ही भारीच अभद्र बोलताहात. " असें म्हणत ती नवऱ्यापासून दूर दिव्याच्या कोनाड्याकडे तेलवात करायला गेली. कारण तीन्हीसांजा पुरत्या टळून काळोख पसरत चालला होता.

—देवळांत गेलेल्या सासूबाई कधीं येतील याचा नेम नव्हता.

———

## काश्मिरी कापड : : ५

राजाला सुंदर कपड्याचा कमालीचा षोक होता. हरतऱ्हेचे कपडे तो नेहमीं पाहात असे. पण त्याच्या चोखंदळ वृत्तीला कांहींच पटत नसे. सर्वांत उंची, सुरेख कापड आपण वापरावें अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. आपण व आपल्या बायकोनें राजधानींतून हिंडताना उत्तम कपडे पेहरले पाहिजेत— इतके चागले, कीं बघणाराचे डोळे दिपून गेले पाहिजेत— आपलें खरेंखुरें राजवैभव पोषाखात खुलून दिसायला हवें, अशा प्रकारचे विचारतरंग राजाच्या मनात सदैव येत.

—त्याच्या देशांतले व परदेशांतील विणकरी उत्कृष्ट कापडाचा ध्यास घेतलेल्या राजास सतुष्ट करण्याची संधि मिळावी याकरतां झटत होते— प्रत्येक विणकरी जिवापाड राबून अतिशय सुबक, अगदीं त्याच्या मनाजोगा वाण तयार झाला कीं राजाकडे जाई.

—उत्सुकतेनें राजाही पण कापड पाही, नंतर तो थोडासा विचारात पडल्यासारखा होई न् तोंडावर किंचित् असमाधान दाखवून म्हणे,

‘ याच्यापेक्षा सरस कापड नाहीं का ? असलं तर दाखव. ’

हे उद्गार ऐकले कीं मोठ्या ईर्षेनें आलेला विणकरी हिरमुसला होई. कित्येक वेळां असें झालें होतें.

उत्कृष्ट कापड बनवण्याबद्दल आख्या असलेल्या गांवांचे लोक राजानें माल नाकारल्यानें परत गेले.

——काश्मीरकडच्या कांहीं नामांकित व्यापाऱ्यांनीं राजाच छंद पुरविण्याचें ठरवून होत्या नव्हत्या तेवढ्या कापडाच्या तऱ्हा बरोबर घेतल्या—यांपैकीं कुठला तरी सणंग राजाच्या पसंतीस उतरेलच अशी खात्री त्यांना वाटत होती. राजाला आपण खूप करूच अशा हिरिरीनें व्यापाऱ्यांनीं काश्मीर सोडलें.

——परंतु ते देखील राजाचें समाधान करूं शकले नाहींत. माघारी जाताना व्यापारी वैतागून म्हणाले——

' पृथ्वीवर या राजाचं कापडाचं कोडकौतुक पुरवणारा कुणीच दिसत नाहीं— हा सदा असंतुष्टच राहणार...नुसता कपडा पहात पहातच आयुष्याचा व्यय करणार...इतक्या नमुनेदार काश्मिरी जाती दाखवल्या पण छे ! असल्या राजेशाही वस्तूचा उपभोग घेणं तरी नशिबीं लागतं....'

——याप्रमाणें निरनिराळ्या व्यापाऱ्यांना राजा परतवून लावीत असता एक दिवस कुणी विणकरी त्याच्या दरबारात आला न् लवून मुजरा करून म्हणाला,

' महाराज, मी आपल्याला अगदीं मनात भरेल असं कापड देतों.'

' कुठं आहे ? दाखव. ' राजानें कुतूहलानें विचारलें.

' माझं कौशल्य महाराजाना दिसेलच— आपल्याला हवं तसलं कापड मी बनवतों— मात्र मला कामगिरीसाठीं एक स्वतंत्र वाडा द्यावा. त्यांत मी माग...हुजूर, एकदम मला इनाम देतील असे कपडे तयार करून मी देईनच. ... मला शिंपीकामहि येतं. ... तूर्त मला वाडा पाहिजे. ... कांहीं मुदत पाहिजे. ...मनपसंत कापड नाहीं झालं तर मला हवी ती शिक्षा व्हावी. '

' ठीक ठीक. मी तुझी सारी व्यवस्था करतों. सगळ्या कापडविक्याचा नक्षा उतरवील असा माल मात्र लौकर बनव.' राजा विणकऱ्यास म्हणाला.

' त्याची काळजी नको. ... धोतराचं पान, पागोटं, रेशमी सदरा ... सगळं मी करतों. ... राणीसरकारांना ...'

विणकऱ्याचें वाक्य पुरें होण्याआधींच राजा म्हणाला,

'हो हो ... तिला शालू, चोळी ... माझी अट ध्यानांत आहे नां? ... वाण पण वाण पाहिजे. ...'

'त्याची फिकीरच करूं नका हुजूर ...' विणकऱ्यानें अंमळ घुटमळत पुढें विचारलें. ... 'आपण पुण्यवान आहां ना! ...'

'हा काय प्रश्न? ... मीं पाप तरी केलं नाहीं ...'

'बारीकसारीक बाबींत माणूस पापाची सामग्री जोडीत असतो. ... तेंहि हलके हलके कळेलच ...'

'याचा इथं काय संबंध?' राजानें जरा रागातच विचारलें.

दरबारातलीं माणसेंहि विणकऱ्याकडे चमत्कारिक तऱ्हेनें पाहू लागलीं.

'काहीं विशेष नाहीं.' विणकरी नम्रपणानें म्हणाला. 'माझं कापड पापी माणसाला दिसायचं नाहीं. ... तुम्ही पापी नाहीं. ...'

'कोण म्हणतो हुजूर पातकी आहेत?' शेजारीं असलेला प्रधान दरडावणीच्या स्वरात बोलला.

'नाहींतच हुजूर पापी.' दरबारातला जो तो राजास आपण त्याचा कैवार घेतों आहोंत हें समजेल, अशा पद्धतीनें म्हणत होता.

'महाराज, तुमच्या भोवतालच्या सगळ्याचं ठाम मत आहे कीं तुम्ही सज्जन आहात. तुमच्या चांगल्या कृत्याची स्तुतिच सर्वांशास ऐकू येते. ... तुम्हाला कापड दिसेलच. ... मी सुरवात तर करतो. ... येऊन पाहा आपण ...'

विणकऱ्यानें राजाचा अदबीने निरोप घेतला.

—त्याला एक मोठा वाडा कापड तयार करण्यासाठीं देण्यात आला. त्यातल्या ऐसपैस दालनांत दोन टोंकाला खुट्या ठोकून विणकऱ्यानें मागाची व्यवस्था केली – राजा विणकऱ्याची कामात किती प्रगति होते तें पाहायला दोन तीन दिवसांनीं येई. कपडे पेहरण्याची त्याला अत्यंत उत्कंठा होती.

राजाची स्वारी आली कीं विणकरी आपण माग चालवतों आहोंत हें दाखवण्याकरता उगीचच हात इकडे तिकडे करी.

'हें काय? वेड्यासारखे हातवारे का करतोस!' राजानें पहिल्याच खेपेस विचारलें.

'वा: सरकार! कित्ती तलम अन् छान कापड तयार होतंय् ...

काश्मीरमध्ये ज्या गुरूपाशीं मी ही रीत शिकलों त्याची केंवढी सेवाचाकरी करावी लागली मला. हा धागा पाहा ... नुसता मऊ मऊ ... दृष्टींत ठरायचा नाहीं इतका बारीक ... '

विणकऱ्यानें दाखवलेल्या जागीं राजानें नुसतें बोटावर बोट घातलें. त्याच्या हाताला सुताचा स्पर्श झाल्यासारखें भासलें नाहीं.

इतक्यात विणकरी म्हणाला,

' हुजूर, तुम्ही खरोखर भाग्यवंत ... मी मेल्यावर माझी कला जाईल ... देवादिकानासुद्धा असा वस्त्रलाभ होणार नाहीं. ... आपण काश्मिरी व्यापारी परत लावलेत तेव्हा म्हटलं, आहे ! आपल्या गुणाचं चीज करणारा कुणी तरी आहे ... एवढा महाग नग मी आताच निर्माण करतों आहें ... मेहनतीचं फळ मिळत असलं कीं हुपारी येते ... नाहीं तर दुसऱ्या देशचे राजे ... त्याना हें सूतहि दिसणार नाहीं ... असल्या सुतानं मला स्वर्गच मिळाला असता ... मला त्यानीं सुळा चढवलं असतं ... राजेसरकार, आपण खरोखर पुण्यवान् आहां... '

राजाला बरें वाटलें. त्यानें लगेच दरबारातला एक सरदार बरोबर होता त्यास विचारलें,

' का रे ... आहे का नाहीं सुरेख धागा ? छान कापड होईल नाहीं ? '

' तर तर ! तें काय विचारावं ? ' राजदरबारच्या होयबांनीं मान डोलवीत म्हटलें.

' तूं पुण्यशील आहेस ... तुला सार दिसतं. ' राजानं त्या सरदाराला भलेपणा दिला. अर्थात् त्याला राजाच्या पुढें पुढें करण्याचें श्रेय मिळालें.

विणकऱ्याच्य वाड्यात राजाच्या वरचेवर खेपा होत. राणीला लग्गी कधीं तो नेई. त्याना दुरून पाहिलें कीं विणकरी तर उद्योग सोडून माग चालवतानाचे हातवारे करीत राही.

राजाला न् राणीला कापड एवढेंच नव्हे तर धागादोरा देखील दिसत नसे. विणकरी म्हणे,

' उत्तम– भारीपैकीं वाण निघतो आहे अ ! '

' छान् आहे नाहीं कापड ? ' राजा नोकरांना व राणी, दासींना विचारी.

'इतके कापडवाले येऊन गेले— या काश्मिरी कापडाचा नमुना औरच बाकी !' हुजरे न् दासी अशा आशयाचें उत्तर नेहमीं देत.

राजाला मनात वाटे आपणच पापी आहोंत. राणीला पण अशीच जाणीव होई— परंतु आपली प्रजा पुण्यवान् आहे. लोक आपल्या तयार होत असलेल्या कापडावर अगदीं भाळून गेले आहेत याचें राजाराणींना अतिशय समाधान होत होतें.

एकदा राजा मनाशीं म्हणाला,

'आपलं आपल्याला नाहीं दिसलं तरी हरकत नाहीं ... जगाकडून वाहवा झाली पाहिजे .. दरबारातून मी नित्य नवीन मनुष्य आणतों... प्रत्येकजण कापडाची मनसोक्त स्तुति करतो आहे ... हा विणकरी आपली फार दिवसाची मनीषा तृप्त करणार ...'

—विणकरी एक दिवस म्हणाला, 'महाराज, कापड झालंच जवळ जवळ. आपण व राणीनं ह्या सुंदर कापडाचे कपडे घालून हत्तीवरून राजधानीभर हिंडावं ... लोकाना धन्य वाटेल.'

राजालाहि आपणाला अखेरीस नामांकित कपडा मिळाला हें प्रजेला दाखवायचें होतें.

विणकऱ्यानें शिंपीकाम पण केलें. कपडे बनवले. राजा-राणीची मिरवणूक विणकऱ्याच्या वाड्यापासून काढावी असें ठरलें.

सर्व सिद्धता झाली. राजा विणकऱ्याच्या साहाय्यानें कपडे बदलूं लागला.

विणकरी त्याला कपडा चढवीत असल्यासारखे हात करी. राजा विचारी,

'कसं काय दिसतंय् कापड !'

'सरकारस्वारी नुसती खुलून दिसतीय् !' विणकरी दरखेपेस असेंच काहीं तरी म्हणे.

वास्तविक राजा संपूर्ण नग्न झाला होता. परंतु विणकऱ्यानें घातलेले कपडे आपल्याला दिसत नसले तरी लोकाना दिसताहेत यावरच तो संतुष्ट होता.

राणीलाहि विणकऱ्यानेंच सजवलें ! तिचें पहिलें लुगडें काढून तिला शालू चोळी घालीत असल्याचे हावभाव त्यानें बेमालूम रीतीनें केले.

राणी भयंकर लाजली.

राजालाहि बायकोकडे पाहून चमत्कारिक वाटलें. तथापि तो मनात म्हणाला,

'आपल्याला ती या स्वरूपात पाहायला मिळाली ... मी तिला असा दिसलों तरी चालेल. लोक माझ्या उंची कपड्याला नावाजताहेत– तिच्या शालूला बायका वाखाणताहेत—'

राजा नोकराना पुन्हा पुन्हा विचारायचा,

'सुरेख आहे ना पोषाख ?'

'प्रश्नच नाही !' 'छान' 'एकदम छान' असलीं उत्तरें नजीकच्या नोकराकडून ताबडतोब मिळत.

राणीहि दासींना विचारी,

'शोभतो का मला शालू !'

'बाईसाहेब फारच उठावदार दिसताहेत.' आसपासच्या दासी म्हणत.

प्रधान, सरदार, त्याच्या बायका सगळेजण राजाराणी अंबारींत चढेपर्यंत त्याच्या कपड्याची भयंकर तारीफ करीतच होते.

प्रत्येकाला हास्याचा उमाळा येत होता, पण तो कष्टाने दाबून धरण्याची प्रत्येकाची शिकस्त चालली होती. कारण स्वतःला दिसते ती वस्तुस्थिति सांगितल्याने एक तर राजाच्या मर्जीविरुद्ध वर्तणूक होईल का काय ही भीति होती अन् दुसरें म्हणजे एवढ्या सगळ्या जमलेल्या पुण्यवान् समाजात आपण एकटेच पापी असल्याची कबुली देणे होते. प्रत्येकाला वाटे कीं दुसरा ज्या अर्थी राजाच्या कपड्याची इतकी वाहवा गातो त्या अर्थी त्याला ते खास दिसत असले पाहिजेत. आपल्यालाच राजाराणी अशीं विचित्र कशीं दिसतात–आपणच दोषी असलों पाहिजे– याच भरंवशावर जो तो राजास नवीन नवीन कपड्याबद्दल धन्यता देत होता.

राजाराणींना कपडे नसल्यासारखेंच भासत होतें. मध्यन्तरीं वारा सुटला तो त्याच्या उघड्या अंगाला चांगलाच झोंबला. कांहीं पांघरूण अंगावर घ्यावें असें त्याच्या मनात आले—पण लोकाना मग सुंदर कपडे कसे दिसतील ! --कपड्याच्या प्रदर्शनासाठीं तर सारा खटाटोप होता.

मिरवणूक निघाली.

सैन्यातले शिपाई– हरतऱ्हेचीं वाद्यें...हत्तीच्या आजूबाजूला घोडदळ

अशा थाटांत हुजूर स्वारी चालली होती. गच्चीवर, सज्जात, रस्त्यावर पुरुषाचे नि बायकाचे थवेच्या थवे राजाराणींना पाहण्यास जमले होते.

जिकडे जिकडे राजाची अगर राणीची नजर वळे तिकडे तिकडे पुरुष बायका तोंडावर प्रसन्नता दर्शवून त्यास अभिवादन करीत व राजाराणींना ऐकूं जाईल अशा आवाजात म्हणत,

'पहिल्या प्रतीचं कापड आहे... अप्रतिम दृश्य आहे...याला उपमा नाहीं!'

ही प्रशंसा ऐकली कीं राजाराणींना आनंद होई. राजास जीवितेंच सार्थक झालेंसें वाटे.

--अंबारींतलें वैभव पाहण्यासाठीं राजधानींतल्या एकूण एक रहिवाशाची धडपड चालली होती. मुळात काहीं नाहीं असा संशय बाळगणारे अंवतींभोंवतींच्या इसमाना काश्मिरी कापड आवडलेले बघून स्वतःही राणीच्या नि राजाच्या पोषाखाचे गुणवर्णन करूं लागले. दुसऱ्याच्या शिफारसीवर भिस्त ठेवून राजासमोर घोडा घोळण्याची शिकस्त केली जात होती. राजाला आपली प्रजा पुण्यवान् आहे याबद्दल हर्ष होत होता.

—रस्त्यावरच्या गर्दींमध्यें एका भिकारणीचे लहान मूल आईला बिलगून उभे होतें. डोळे टवकारून तें सारखे अंबारीकडे बघत होतें...हत्ती जवळ येत चालला तसा आईच्या खांद्यावर बसून मौज पाहण्यासाठीं त्याने गळा काढला.

त्या मुलाच्या आईनें—भिकारणीनें—लेकाला कडेवर घेतले....ती शक्य तेवढी हत्तीशेजारीं गेली.

मुलानें मान उंच केली न् तें हंसलें व टाळ्या पिटीत ओरडले—

'अग आई...गंमत गंमत...राजाराणी नागवीं नागवीं...माझ्यासारखीं ...मला सदरा नाहीं. तूं फाटकंतुटकं नेसतेस...राणीला तेंहि नाहीं...'

'कारट्या, असं बोलावं का? इतका चळलास कसा? मेल्या, राजा मारील ना! मोठ्या माणसापुढं त्याच्या कलाप्रमाणे बोलाव...सांगितलं नव्हतं तुला? फाजील शहाण्या, मर...' मुलाला रस्त्यावर आदळीत भिकारणीनें त्याचें तोंड दाबलें...तिच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला.

—राजानें व राणीनें भिकारणीच्या पोराचे उद्गार ऐकताच त्या दिशेला नजर वळवली. राजा चांगलाच चमकला.

मूल अजाण— लहान, सहासात वर्षांचें. तें पापी कसें असेल ? त्याला असें कसें दिसलें ?

‘ काय रे, खरं बोल. मी नग्न आहें ना ? ’ राजानें अंबारीच्या मागें उभ्या असलेल्या हुजऱ्याला करड्या आवाजांत विचारलें.

‘ हो. कपडे आणून देऊं का ! ’

हुजऱ्याचा जबाब ऐकून राजा चिडला. इकडे राणी दासीला विचारीत होती,

‘ माझ्या अंगावर काहीं नाहीं ना ? ’

‘ छेः ! देऊ का जरीचं लुगडं ? ’

दासीच्या उत्तराप्रमाणेंच आणखी दोघा तिघां राजदरबारीं खुषमस्कऱ्याचे आणि होयबाचे जबाब आले. नोकरांनीं झटपट कपडे घालायला देण्याची तयारी दर्शवली.

अंबारींतलें नक्षीचें वस्त्र राजाराणींनीं घाईघाईनें अंगावर घेतलें न् मिरवणूक रद्द केली. हत्तीला राजवाड्याकडे लौकर पिटाळण्यास त्यांनीं माहुताला फर्माविलें.

लोकात तोंड दाखवण्याची राजाला लाज वाटायला लागली. राणी तर लाजेनें अगदीं चूर होऊन गेली.

एकदर गोष्टीचा जिकडे तिकडे चांगलाच बोभाटा होणार, आपलें कपड्याचें वेड आपल्याला वेडें करण्यास कारणीभूत होणार याचा राजास पश्चात्ताप झाला.

त्यानें राजवाड्यात जातां जाता विणकऱ्याची चौकशी केली. पण तो केव्हांच पसार झाल्याचें राजास कळलें.

या अनुभवानें राजाराणी शहाणीं झालीं. त्या भिकारणीला न् तिच्या मुलाला राजानें ठेवून घेतलें.

भोंवतालच्या टाळ्या पिटणाऱ्या लोकांबद्दल त्याची आपुलकी नष्ट झाली. दुसऱ्यावर न विसंबतां राज्यकारभाराच्या हरएक बाबतींत राजा लक्ष घालूं लागला. प्रत्यक्ष खात्री पटल्याखेरीज कोणत्याहि गोष्टीवर तो विश्वास ठेवीनासा झाला.

———

# लोककथाविभागाचीं टिपणें

**केतकीचें फूल कोण तोडतंय्**—पिरंगुट हें मावळातलें गाव भोर संस्थानच्या ताब्यातील आहे. पौडला जाताना वाटेंत तें लागतें. पिरंगुटच्या गीताबाई राइरीकर यानीं 'नवरत्नाचा हार' व 'केतकीचं फूल कोण तोडतंय्?' या दोन लोककथा सांगितल्या. या वृद्ध बाईंनीं त्या लोककथा लहान वयात ऐकल्या आहेत. त्यांचे बालपण पुरंदर तालुक्यातल्या सोनोरी या गांवीं गेलें आहे.

पंढरपुरापासून सात कोसावर असलेल्या करकंब गावच्या सौ. राधाबाई दातीर (वय पन्नाशीच्या आसपास) यांच्याकडून कमींत कमी दहा लोककथा प्रस्तुत लेखकास कळलेल्या आहेत. सौ. राधाबाईच्या पुरत्या ध्यानात नसलेल्या अशा काहीं गोष्टींतले तुटक अर्धवट प्रसंग संपूर्ण सांगणे वयोमानानें व कथाकथनाचा परिपाठ मोडल्यानें त्यांना शक्य झालें नाहीं. **ऊन्ह धरणारी बायको, बिलंदर जालंदर** आणि **काश्मिरी कापड** या लोककथा अर्धामुर्ध्याच प्रथम कानावर पडल्या. कुठे शेंडा कुठे बुडूख अशीच त्रोटक माहिती पहिल्यानें टिपून ठेवण्यात आली होती. सौ. दातीर या पूर्वी मुलीला गोष्टी सांगत असत आणि त्यांची कन्या सौ. सोनूताई कानिटकर यांच्याकडूनच लेखकाला वरील तीन लोककथा मिळाल्या आहेत.

**बिलंदर जालंदर** या लोककथेचे मूळ नाव 'नातजावयाची गोष्ट' असें आहे. 'विविधवृत्ता'त ती प्रसिद्ध होताच वाचनात आल्यामुळे एक बाई हीच लोककथा वेगळ्या प्रकारानें आपणास अंधुक ठाऊक असल्याचें बोलल्या. कजाग सावत्रआई, कलावंतीण, दागिने गमावणारी बाई, जिची नात पळवली ती आजीबाई या ठकवल्या गेलेल्या सर्वजणींची त्या नातजावयाचे शोधांत असताना गाठ पडते. त्या मिळून तपास चालवतात आणि नातजावयाचा ठावठिकाणा न लागल्यानें माघारीं जातात, एवढा फरक त्यांच्या गोष्टींत आहे. नातजावई फसवून कुणाचा तरी घोडा नेतो असेंहि काहींतरी गोष्टींत असल्याचें त्या बाईंच्या साधारण स्मरणात होतें.

**'अस्सल तें कमअस्सल'**—सौ. राधाबाई दातीर यानीं आठवून आठवून पूर्ण स्वरूपात निवेदन केलेली ही लोककथा आहे.



## वि. ग. भिडे यांचीं पुस्तकें



| | | |
|---|---|---|
| १ | गगनाला गवसणी | ( पहिली आवृत्ति संपली ) |
| २ | कण्हेरीचीं फुलें | ( कथासंग्रह ) किं. १॥ रु. |
| ३ | टोळधाड | ( गोष्टी ) किं. २ रु. |
| ४ | मोत्यांचें कणीस | ( लोककथा ) किं. २ रु. |
| ५ | श्रावणसरी | किं. २ रु. |
| ६ | धूमकेतु | वत्सला साहित्य प्रकाशनमार्फत पुस्तकरूपानें निघेल. |



| | | |
|---|---|---|
| ७ | तोफेच्या तोंडीं | ( कादंबरी ) |
| ८ | मोत्यांचें कणीस | भाग दुसरा |
| ९ | मुष्टिमोदक | महात्मा फुले ग्रंथालयातर्फे छापलें जात आहे. |